# नवभारत

वर्ष १० वें ] जून १९५७ [ अंक ९



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष दहावें

अंक नववा

# नवभारत

जून

१९५७





वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )





# 'नवभारत' मासिक, जून १९५७

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.-- का. सं. ]

श्री. प्र. रा. देशमुख, बी. ए. एल्. एल्. बी. : यवतमाळ येथें वकील; " The Indus civilisation in the Ṛgveda " या पुस्तकाचे लेखक.

श्री. पांडुरंगराव देसाई एम्. ए. : उटकमंड येथें भारत सरकारच्या एपिग्राफी कचेरींतील अधिकारी; नाणावलेले संशोधक.

प्राचार्य र. म. भुसारी, एम्. ए. : सिकंदराबाद येथील महबूब कॉलेजचे प्राचार्य; मराठीचे प्राध्यापक.

प्रा. रा. ना. गद्रे, एम्. ए. एल्. एल्. बी. : पुणें येथील स. प. कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक.

श्री. चिं. रा. वोंद्रे, बी. कॉम. : किर्लोस्कर ऑइल एंजिन्स पुणें यांचे निर्यात विभाग प्रमुख.

प्रा. सौ. सरोजिनी शेंडे, एम्. ए. : मुंबईच्या इस्माइल युसुफ कॉलेजांतील मराठीच्या प्राध्यापक.

प्रा. मो. स. गोसावी बी. ए. एम्. कॉम : पुणें येथील बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजांतील प्राध्यापक; भूगोल विभागाचे प्रमुख.

श्री. शि. बा. नामजोशी : सोलापूर येथील शिक्षक.

श्री. लक्ष्मीनारायण भारतीय : काशी येथील " भूदान यज्ञ " साप्ताहिकाचे कार्यकारी संपादक.

---

### चुकीची दुरुस्ती

मुद्रणदोष पृष्ठ ८ वरील ३० नंबरची टीप येथें छापत आहोत.

३० अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरिड्यो नूतनैरुत ।
स देवाँ एह वक्षति ॥ १-१-२

अनुक्रमणिका








श्री. प्र. रा. देशमुख

# प्राचीन भारतीय इतिहास व ऋग्वेद

## इतिहासाचें अमोल साधन

जगांतील अत्यंत प्राचीन वाङ्मयांत ऋग्वेदाची गणना होते. ऋग्वेद प्राचीन तर आहेच परंतु त्याचा विस्तारहि मोठा आहे. 'वालखिल्यें' आणि 'आप्री' सूक्तें ज्यांच्या मौलिकत्वाबद्दल संशय व्यक्त केला जातो, अशीं सूक्तें सोडल्यास ऋचा मूळच्या स्वरुपांत आपणापर्यंत येऊन पोहोंचल्या आहेत. ऋचांचें संहितीकरण झाल्यामुळें त्यांत प्रक्षिप्त ऋचा घालणें कठीण झालें. ऋचांच्या स्वरूपांत बदल होऊं नये म्हणून प्राचीन ब्राह्मणांनीं फार काळजी घेतली व हें प्रचंड वाङ्मय, वर्णाचा किंबहुना स्वराचाहि फरक न होऊं देतां आपणापर्यंत पोहोंचविलें आहे. त्यामुळें ऋचा आपणांस मूळच्या स्वरूपांत वाचावयास मिळतात. हा ऋग्वेदाचा दुसरा महत्त्वाचा विशेष होय. हें प्राचीन वाङ्मय, धर्मदृष्ट्या फार महत्त्वाचें असल्या-मुळें, त्याची प्राणापलीकडे जोपासना करण्यांत आली. ही गोष्ट खरी असली तरी सुमारें चार हजार वर्षांपूर्वीची भारतांतील मानवसमाजाची स्थिति दाखविणारें वाङ्मय व इतिहासाचें साधन म्हणूनहि ऋग्वेदाचें महत्त्व अपरंपार आहे.

इतिहासाचें साधन म्हणून ऋग्वेदाचा व्हावा तसा आणि व्हावा तितका अभ्यास न झाल्यामुळें त्यांतून मिळणें शक्य असलेली बरीच महत्त्वाची माहिती अज्ञात राहिली आहे. विशेषतः हरप्पा आणि मोहेंजदारो येथील उत्खननांत उपलब्ध झालेल्या पुराव्याचें साहाय्यानें ऋग्वेदाचा अभ्यास केल्यास त्यांतून बरीच महत्त्वाची माहिती उपलब्ध होऊन उत्खननांतून अंधुक अंधुक दिसणारा आर्यपूर्व लोकांचा इतिहास स्पष्ट व साकल्यानें दिसूं लागतो. प्राचीन भारतीय इतिहास अनेक शतकें मागें जाऊन एका महान् प्राचीन संस्कृतीशीं जोडला जातो व इतिहासास अद्यापि न उलगडलेलीं महत्त्वाचीं प्रमेयें उलगडून भारतीय सांस्कृतिक जीवनावर नवीन प्रकाश पडतो.

## ऋचांतून इतिहास कसा सांपडतो ?

ऋचा वाचतांना आणि त्यांचे अर्थ लावतांना प्रामुख्यानें दोन महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत ठेवावयास पाहिजेत. त्यांपैकीं पहिली आणि महत्त्वाची गोष्ट ही कीं, ऋचा देवांच्या स्तुतिपर सूक्तें असल्या तरी त्यांतून प्राथमिक आर्यांचा इतिहास प्रामुख्यानें आला आहे. ऋचांतून इन्द्र, अग्नि, मरुत्, अश्विनौ, उषस् इत्यादि देवांची स्तुति केली आहे. ह्या स्तुतींत प्राथमिक आर्यांनीं जीं विजीगिषेचीं अचाट कृत्यें केलीं, दासां-बरोबर युद्धें केलीं, त्यांचीं पुरें फोडलीं, जाळलीं आणि लुटलीं, त्यांची कत्तल केली ह्या सर्व गोष्टी त्या त्या आर्यांसाठी देवांनींच केल्या असें वर्णन आहे. ऋचांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्या जरी देवांच्या स्तुतिपर असल्या तरी त्यांतून प्राथमिक आर्यांचें दासांबरोबर झालेलें संघर्षच वर्णिले आहेत हें दृष्टोत्पत्तीस येईल. ऋचा १-५१-६[1] इन्द्राच्या स्तुतिपर आहे. तिचा अर्थ असा '(इन्द्रा) तूं शुष्णाला ठार मारण्याचें युद्धांत कुत्साचें रक्षण केलेंस. अतिथिग्वासाठीं शम्बराला ठार मारलेस. अर्बुद एवढा मोठा तरी त्याला पायानें उलंघिलेस. चिरकालापासूनच दस्यूंची कत्तल करणें तूं जाणतोस'. वरील ऋचेंत स्तुति जरी इन्द्राची आहे तरी माहिती मिळते प्राथमिक आर्य कुत्स आणि अति-

१ त्वं कुत्सं शुष्णहत्येष्वाविथारन्धयोऽतिथिग्वाय शम्बरम् ।
महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे ॥ १-५१-६








थिग्व दिवोदासाबद्दल. कुत्सानें शुष्णास ठार मारलें. अतिथिग्व दिवोदासानें शम्बर व अर्बुद यांना ठार मारलें व दस्यूंची कत्तल केली. ह्या गोष्टीं जरी कुत्स आणि अतिथिग्वांनीं केल्या तरी त्यांच्यासाठीं त्या इन्द्रानेंच केल्या असें ऋचांतून वर्णन आहे. ऋचांतील देवांच्या स्तुतींत प्रथम मण्डलापासून दशम मण्डलापावेतों ह्याच तन्त्राचें अवलंबन केलें आहे. प्राथमिक आर्यांनीं केलेले पराक्रम इन्द्रानेंच त्यांच्यासाठीं केले अशीं वर्णनें ऋग्वेदांच्या पहिल्या मंडलापासून दशम मण्डलापर्यंत आलीं आहेत. उदाहरणार्थ ऋजिश्वनानें पिप्रु आणि वङ्गृदाचीं शहरें वेढा घालून फोडलीं ( १-५१-१; १-५३-८ ) कुत्सानें इलिबिशाचीं तटबंदीचीं शहरें फोडलीं आणि शुष्णाला ठार मारलें ( १-३३-१२ ). दिवोदासानें शम्बरास ठार मारलें व त्याचीं दगडाच्या तटबंदीचीं प्राचीन शहरें फोडलीं ( २-१४-७; ४-३०-२० ) व वर्चिला त्याच्या पन्नास हजार अनुयायांसह ठार मारलें ( २-१४-६ ). सुदासानें अंहुची संपत्ति लुटली व त्याला ठार मारलें ( १-६३-७ ). पुरु कुत्सानें शत्रूंचीं सात शारदीय पुरें जिंकून घेतलीं. त्रसदस्यूनें दासांवर स्वाऱ्या करून त्यांच्या कत्तली उडविल्या, त्यांची सर्व चीजवस्तु लुटून घेऊन त्यांना दूर पिटाळून लावलें. हे सर्व पराक्रम निरनिराळ्या व्यक्तींनीं केले असले तरी ते त्या त्या व्यक्तींसाठीं इन्द्रादि ऋचांतील स्तुत्य देवांनींच केले असें ऋचांतून वर्णन आहे. ऋचा जरी इन्द्रादि देवांच्या स्तुतिपर असल्या तरी वास्तविक त्यांतून प्राथमिक आर्यांच्या दासांबरोबर झालेल्या संघर्षाचा इतिहासच दिला आहे. यावरून ऋचांना आर्यांच्या विजीगिषेचा इतिहास म्हणणेंच सयुक्तिक होईल. ऋचांतील वर्णनाची यथार्थ कल्पना यावी म्हणून १-५३-८ व १-६३-७ [३] ह्या दोन ऋचा खालीं उधृत केल्या आहेत. त्यांचा अर्थ असा ' अतिथिग्वाच्या प्रकाशमान वेढ्यानें ( इन्द्रा ) तूं करञ्ज आणि पर्णय यांना ठार मारलेंस. ऋजिश्वनानें वेढा घातलेलीं वङ्गृदाचीं शंभर शहरें तूं एकट्यानेंच फोडलींस. ( १-५३-८ ). ' ' हे वज्रधरा इन्द्रा पुरुकुत्सासाठीं युद्ध करून तूं प्रसिद्ध सात ( शारदीय ) पुरें फोडलींस. तुला हविर्दान करणाऱ्या सुदासासाठीं हे प्रकाशमान इन्द्रा तूं अंहूची संपत्ति विना आयासानें दर्भाप्रमाणें मिळवून दिलीस ' ( १-६३-७ ). ह्या दोन्हीं ऋचा इन्द्राच्या स्तुतिपर असल्या तरी वास्तविक त्यांतून अतिथिग्व दिवोदास, ऋजिश्वन्, पुरुकुत्स व सुदास या प्राथमिक आर्य व्यक्तींबद्दल माहिती मिळते. अतिथिग्व दिवोदासानें करञ्ज व पर्णय यांना ठार मारलें, ऋजिश्वनानें वेढा घालून वङ्गृदाचीं शंभर शहरें फोडलीं, पुरुकुत्सानें शत्रूंचीं प्रसिद्ध शारदीय पुरें जिंकलीं आणि सुदासानें अंहुची संपत्ति लुटली अशी ऐतिहासिक माहिती आपणांस मिळते. ऋग्वेदांतून नुसती आर्य व्यक्तींबद्दलच ऐतिहासिक माहिती मिळते असें नव्हें तर आर्यांच्या शत्रूबद्दलहि फार महत्त्वाची माहिती मिळते. त्यावरून आर्य भारतांत येण्यापूर्वी तेथें असलेल्या लोकांचे आणि त्यांच्या संस्कृतीचें सम्यक् चित्र आपणांस पहावयास मिळतें. वर वर्णन केलेलें तन्त्र ऋग्वेदांतून आदिपासून अंतापावेतों अगदीं काटेकोरपणें अवलंबिलें असल्याचें, अतिथिग्व दिवोदासा संबंधीं माहितीच्या सर्व ऋचा पुढें दिल्या आहेत, त्यावरून ज्यास्त ध्यानांत येईल.

## सुमारें दोन शतकांचा इतिहास

प्राथमिक आर्यांचा ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांतून आलेला इतिहास दीड दोन शतकांच्या कालावधि पुरतांच सीमित आहे असें दिसतें. भारत वंशांतील श्रेष्ठ पुरुष दिवोदास हा वध्र्यश्वाचा मुलगा ( ६-६१-१ ), दिवोदासाचा मुलगा ' दाशराज्ञ ' युद्ध जिंकणारा प्रसिद्ध सुदास. सुदास आणि पुरुवंशांतील श्रेष्ठ राजा पुरुकुत्स हे समकालीन होते. पुरुकुत्स ' दाशराज्ञ ' युद्धांत मारला गेला. पुरुकुत्साचा मुलगा प्रसिद्ध त्रसदस्यु त्याच्या मरणानंतर जन्मला. त्रसदस्युचा मुलगा कुरुश्रवण. त्रसदस्यूच्या नातवापर्यंतची माहिती ऋचांतून मिळते. पुरूंच्या पांच पिढ्या व त्या पूर्वीच्या भारतांच्या तीन पिढ्या अशा एकूण आठ पिढ्यांचा इतिहास ऋग्वेदांत कालानुक्रमानें सांप-

---

२ त्वं करञ्जमुत पर्णयं वधीस्तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी ।
त्वं शता वङ्गृदस्याभिनत्पुरोऽनानुदः परिषूता ऋजिश्वना ॥ १-५३-८

३ त्वं ह त्यदिन्द्र सप्तयुध्यन्पुरो वज्रिन्पुरुकुत्साय दर्द ।
बर्हिर्न यत्सुदासे वृथा वर्गंहो राजन्वरिवः पूरवे कः ॥ १-६३-७








डतो. म्हणजे सुमारें दोन शतकांचा प्राथमिक आर्यांचा त्रोटक इतिहास ऋचांतून आढळतो. ह्या आठहि पिढया भारतांतच होऊन गेल्या. प्राथमिक आर्यांचा, ऋचांत आलेल्या इतिहासास सुरवात होण्यापूर्वींचें एक शतक व नंतरचें एक शतक एवढा कालावधि, ऋचा होण्यापूर्वी गेला असें मानल्यास आर्यांचा भारतांत प्रवेश झाल्यानंतर अंदाजे चार शतकांनीं ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचा निर्माण झाल्या असाव्या. ही रचना पुढें अनेक शतकें चालली असावी.

## भारतांतील प्रवेशानंतरचे संघर्ष

प्राथमिक आर्यांनीं भारतांत प्रवेश केल्यानंतर त्यांचे तेथील लोकांशीं संघर्ष झाले. ह्या संघर्षांचीं वर्णनें ऋचांतून आलीं आहेत. ऋग्वेदांतील ऋचा रचल्या गेल्या त्या वेळीं पूर्वआर्यांना ऐतिहासिक स्वरूप प्राप्त झाले असून त्यांच्या आर्यपूर्व लोकांबरोबर झालेल्या संघर्षांना ऐतिहासिक माहितीचें महत्त्व प्राप्त झाले होतें. पूर्वआर्यांपैकीं विदथीपुत्र ऋजिश्वन्, आर्जुनिचा मुलगा कुत्स, भारतवंशांतील वध्र्यश्वाचा मुलगा सुप्रसिद्ध दिवोदास, त्याचा मुलगा सुदास, पुरुवंशांतील श्रेष्ठ पुरुकुत्स आणि त्याचा शूर मुलगा त्रसदस्यु यांच्या दासांबरोबर झालेल्या संघर्षांचीं वर्णनें ऋग्वेदांतून पहिल्या मंडलापासून दशम मंडलापावेतों सर्वत्र आढळतात. ऋग्वेदांतील ऋचांतून वर्णन केलेलीं प्राथमिक आर्यांची दासांबरोबर झालेलीं सर्व युद्धें भारतांतच झालीं, हें ऋचांतून आलेल्या भौगोलिक आणि इतर वर्णनांवरून निश्चित ठरतें. सुदासाचें पांच आर्य आणि पांच अनार्य जमातींशीं सुप्रसिद्ध ऐतिहासिक महत्त्वाचें ‘ दाशराज्ञ युद्ध ’ नांवाचें युद्ध परुष्णि म्हणजे हल्लींच्या रावी नदीच्या काठीं झालें. सुदासाचें सैन्य पाण्यांत बुडविण्याचें उद्देशानें शत्रूंनीं रावी नदीचें पाणी अडवून तीर फोडलें. परंतु वसिष्ठाच्या कर्तबगारीनें व इन्द्राच्या कृपेनें नदीचें पाणी शत्रूसैन्यांत शिरलें व घाबरून पळत सुटलेलें शत्रूंचें सैन्य सुदासानें ‘ ब्राह्मण यज्ञांत दर्भाच्या जुड्या कापतात ’ त्या प्रमाणें कापून काढलें. या युद्धांत सुदासाचा श्रेष्ठ शत्रू पुरुकुत्स मारला गेला. ह्या प्रसिद्ध युद्धाची माहिती ऋग्वेदाच्या सातव्या मंडलांतील १८ व्या सूक्तांतून आली आहे. सुदासाचा पिता दिवोदास यानें सरस्वतीला पणींच्या दास्यांतून सोडविल्याचें वर्णन ऋचा ६-६१-१ मध्यें आहे. दिवोदास आणि सुदास भारतांतच होऊन गेले याबद्दल कोणाचेंहि दुमत असण्याचें कारण नाहीं. पुरुकुत्स हा पुरुवंशांतील प्रसिद्ध पुरुष दिवोदास आणि सुदास या भारतवंशांतील प्रसिद्ध पुरुषांचा समकालीन होता. हाहि भारतांतच होऊन गेला. ह्यानें दासांची सात शारदीय पुरें जिंकून घेतलीं. अतिथिग्व दिवोदास आयु आणि कुत्स हे समकालीन असून त्यांनीं एकत्र होऊन तुरुवंशांतील तरुण सुश्रवसावर हल्ला केला. त्यांत इन्द्राच्या कृपेनें सुश्रवसानें त्या तीन बलाढ्य राजांचा पराभव केला. कुत्स, आयु आणि अतिथिग्व दिवोदास यांनीं शेकडों आणि हजारों ठिकाणीं दस्यूंचा पराभव केला ( २-१४-७ ). ऋचांतून वर्णन केलेलें वर निर्दे-शिलेले सर्व पूर्वआर्य भारतांतच होऊन गेले व त्यांचें कार्यक्षेत्रहि भारतच होतें.

वर निर्देश केलेल्या ऋचा ६-६१-१ मध्यें सरस्वतीनें वध्र्यश्वाला दिवोदास नांवाचा मुलगा दिला, त्यानें सरस्वतीच्या तीरावर राहणाऱ्या पणी नामक आपमतलबी व्यापाऱ्यांना ठार मारून सरस्वतीला त्यांच्या दास्यांतून सोडविलें, ही सरस्वतीची फार मोठी देणगी होती असें वर्णन आहे. सरस्वती ही ऋग्वेदांतील श्रेष्ठतम नदी आहे. ती गंगा यमुना यांच्यापेक्षां बरीच मोठी असून तिच्यांतून नावा चालतात व जी इतरहि अनके प्रकारें उपयुक्त होती. पणी व्यापारी सरस्वतींतून लांबवर व्यापार करीत व खूप नफा मिळवीत ते सरस्वतीची कोणत्याहि प्रकारें परतफेड करीत नव्हते. ही श्रेष्ठतम सरस्वती म्हणजेच सिंधू हें ऋग्वेदांतील वर्णनांवरून उघड होईल ( ७-९५-१; २; ५-५३-८ ). सरस्वती म्हणजे राजपुतान्यांतील ‘ सरसुती ’ असें कांहीं विद्वान मानतात तें बरोबर नाहीं. नदीसूक्तांतील श्रेष्ठ नद्या गंगा, यमुना, सरस्वती ( सिंधू ), शुतुद्रि ( सतलज ), परुष्णि ( रावी ), असिक्नि, मरुद्वृधा, वितस्ता, आर्जिकि आणि सुशोमा भारतांतीलच आहेत याबद्दल आतां दुमत राहिले नाहीं. कांहीं नद्यांचीं नांवें हल्लीं जरी वेगळीं दिसत असलीं तरी मूळच्याच अर्थाचीं आहेत असें दिसून येईल. उदाहरणार्थ, शुतुद्रि म्हणजे सतलज; शुतुद्रि यांत शुत ( श्वेत ) आणि उद्रि ( पाणी ) असे दोन शब्द आहेत. सतलजमध्येंहि दोन शब्द आहेत. सत ( श्वेत ) आणि लज. लज हा शब्द वर्णव्यत्यासानें जल शब्दापासून झाला आहे.








सतजलचे ऐवजीं वगैरेच्यायासानें सतलज झालें असें दिसतें. मूळचा शुतुद्रिचा अर्थ सतलजमध्येंहि कायम आहे. नांवांत फरक कसे आणि कां झाले हें सांगणें कठीण आहे. प्रसिद्ध 'दाशराज्ञयुद्ध' परुष्णि म्हणजे हल्लींच्या रावी नदीचे कांठीं झालें हें वर आलेंच आहे. तसेंच हरियुपिया ( सिंधु उत्खननांतील हरप्पा ) वगैरे शहरांच्या नांवावरून ( ६–२७–५; ६ ) आणि पाक्थ ( पाक्थुनीस्थानांतील पाक्थुन लोक ) शिव ( शिवालीक टेकडीवरील जमाती ) इत्यादि 'दाशराज्ञ' युद्धांत भाग घेणाऱ्या आर्यपूर्व लोकांच्या नांवावरून–जे अद्यापि भारतांत कायम असून त्याच नांवांनीं ओळखल्या जातात–आर्यांचे दासांशीं झालेले संघर्ष भारतांतच झाले हें उघड होईल.

ऋग्वेदांत आर्यांचे शत्रू म्हणून ज्या लोकांचें वर्णन केलें आहे त्यांचे वर्ण, रूप, भाषा, सांपत्तिक स्थिति, व्यापारधंदे, देव, धर्म, अलंकार, घरें, शहरें यांचे हरप्पा आणि मोहेंजोदारो येथील उत्खननांत सांपडलेल्या पुराव्याशीं इतकें विलक्षण साम्य आहे कीं ऋग्वेदांत वर्णन केलेले आर्यांचे शत्रू व हरप्पा संस्कृतीचे लोक एकच होत याबद्दल कोणत्याहि प्रकारचा संशय उरत नाहीं. आर्यांचें आणि त्यांचे संघर्ष होऊन आर्यांनीं त्यांचीं शहरें जाळलीं, त्यांच्या कत्तली उडविल्या, त्यांना देशोधडीस लावलें असें वर्णन ऋग्वेदांत आहे आणि हरप्पा व मोहेंजोदारो येथील उत्खननांतूनहि हीच गोष्ट सिद्ध होतें. याबद्दल विवरण प्रस्तुत लेखकानें अन्यत्र[४] केलें आहे व हरप्पा संस्कृतींतील लोक हेच प्राथमिक आर्यांचें शत्रू असून आर्यांचे ऋग्वेदांत वर्णन केलेले संघर्ष त्यांच्याशींच होऊन आर्यांनीं त्यांची समृद्ध शहरांचीं संस्कृति नष्ट केली हें दाखवून दिलें आहे. पूर्व आर्यांचे दासांबरोबर सप्तसिंधूंच्या प्रदेशांत झालेले संघर्ष ऋचांचा वर्ण्यविषय असल्यामुळें ह्या ऋचा त्यांत वर्णन केलेले संघर्ष होऊन गेल्यानंतर निर्माण झाल्या असाव्या हें निश्चित. तसेंच हें सर्व संघर्ष भारतांत झाल्यामुळें त्यांचे वर्णन करणाऱ्या ऋचाहि भारतांत निर्माण झाल्या हेंहि निश्चित.

## ऐकलेल्या माहितीच्या आधारावर रचना

पूर्वआर्यांचे दासांबरोबर संघर्ष चालूं असतांना ऋचांची निर्मिति झाली असेंहि मानता येत नाहीं. कारण, देवांच्या स्तुतींत ग्रथित केलेली पूर्वआर्यांबद्दलची माहिती फार तोकडी, ठराविक स्वरूपाची व अत्यंत त्रोटक आहे. माहितीच्या ठराविकपणावरून व त्रोटकपणावरून ऋचा रचणारांना त्यांनीं वर्णन केलेल्या संघर्षाबद्दल प्रत्यक्ष माहिती होती असें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष संघर्ष पाहिलेल्या व्यक्तींकडूनहि माहिती मिळाली असें दिसत नाहीं. माहिती तपशीलवार नाहीं. इतकेंच नव्हें तर प्रत्यक्ष पाहणारांच्या अथवा संनिधकालांत घडलेला प्रकार ऐकणारांच्या लिखाणांत जो तपशीलवारपणा आणि जोर असतो तो ऋचांतील वर्णनांत मुळींच दिसत नाहीं. ऋचांतील वर्णनांत अमुक आर्यानें अमुक दस्यूंच्या प्रमुखास ठार मारलें, अमुकांचीं इतकीं शहरें जाळलीं, इतक्या लोकांची कत्तल केली यासारखीं स्थूल स्वरूपाचीं सामान्य विधानें आहेत. ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांची निर्मिति झाली त्यावेळीं काळाच्या दूरपणामुळें अमुक एक गोष्ट घडली एवढी माहिती अस्तित्वांत असावी. ऋचांतील माहिती केवळ ऐकीव स्वरूपाची असून ऋचांना 'श्रुति' म्हणजे ऐकलेलें ( पाहिलेलें नव्हें तें ) म्हणतात ते याच अर्थानें.

## दिवोदासासंबंधी माहिती

ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांची निर्मिति भारतांतच झाली आणि तीहि पूर्वआर्यांचे दासांशीं संघर्ष झाल्यानंतर अनेक शतकांनीं–वर दर्शविल्याप्रमाणें कमींत कमी चार शतकांनीं–झाली हें दाखविण्यासाठीं ऋग्वेदांतील प्रसिद्ध व्यक्ति दिवोदासासंबंधीं ऋग्वेदांतून येणारी संपूर्ण माहिती दिली आहे. " ( इन्द्रा ) तूं शुष्णाला ठार मारण्याचें युद्धांत कुत्साचें रक्षण केलेस. अतिथिग्वासाठीं शम्बराला ठार मारलेंस. अर्बुद एवढा मोठा तरी त्याला पायानें उलंघिलेस. चिरकालापासूनच दस्यूंची कत्तल करणें तुला अवगत आहे.[५] "

४ The Indus Civilisation in the Ṛgveda या पुस्तकांत.

५ त्वं कुत्सं शुष्णहत्येष्वाविथारन्धयोऽतिथिग्वाय शम्बरम् ।
महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे ॥ १-५१-६१








" ( इन्द्रा ) तूं अतिथिग्वाच्या तेजस्वी वर्तनीनें (वेढयानें) करञ्जाला तसेंच पर्णयाला ठार मारलेस.[६]"

" हे इन्द्रा, पालन करणाऱ्या तुझ्या रक्षक शक्तींनीं तुरु वंशातील तरुण सुश्रवसाकडून मोठे राजे कुत्स अतिथिग्व आणि आयु यांना पराभूत करविलेस[७] "

" शत्रूंच्या भीतीनें पाण्यांत प्रवेश करणाऱ्या अतिथिग्व दिवोदासाचें शम्बराला ठार मारण्याचें युद्धांत ज्या पालक शक्तींनीं रक्षण केलें आणि ज्यांनीं त्रसदस्यूचें शहरें फोडण्याचें युद्धांत रक्षण केलें त्याच पालक शक्तीसहीत अश्विनौ आमच्याकडे येवोत[८] ".

" हे सर्व प्रकारच्या इच्छित वस्तु देणाऱ्या अश्विनौ, वृषभ आणि सुसर जोडलेला जो रथ हविर्दान करून तुम्हाला आवाहन करणाऱ्या दिवोदासाच्या घरीं संपत्ति घेऊन गेला तोच तुमचा रथ आमच्याकडे येवो.[९] "

" (हे अश्विनौ) दिवोदासाचे रक्षण करण्याची तुमची श्रेष्ठ इच्छा आम्हास माहीत आहे[१०] ". " हविर्दान करणाऱ्या श्रेष्ठ दिवोदासासाठीं वज्रानें ( रणांत ) थैमान करून ( शत्रूंची ) नव्वद शहरें फोडलीस. अतिथिग्वासाठीं शम्बराला उग्र पर्वताच्या खालीं लोटून आपल्या ओजानें सर्व प्रकारचें श्रेष्ठधन (दिवोदासाला) दिलें[११] ". " ( हे इन्द्रा ) दिवोदासासाठीं शम्बराची नव्याणव पुरें फोडलींस[१२] ". " हे अध्वर्यूंनो ज्या इन्द्रानें ( दिवोदासासाठीं ) दगडांची पक्कीं प्राचीन शहरें फोडलीं व ज्यानें वर्चीचे शत सहस्र ( अनुचर ) कापून काढलें त्याला सोम भरवा[१३] ". " हे अध्वर्यूंनो ज्या इन्द्रानें शेकडों आणि हजारों दस्यूंना पृथ्वीच्या अंकावर मारून पाडलें, ज्यानें कुत्स आयु आणि अतिथिग्व दिवोदासाशीं वैर करणारांना ठार मारलें त्या इन्द्राला सोम भरवा[१४] ".

" जेव्हां मी ( वामदेव स्वतःला इन्द्र कल्पून म्हणतो ) सोमानें मत्त होऊन शम्बराचीं नव्वद आणि नव पुरें फोडलीं आणि सर्वस्व जिंकण्याचें युद्धांत शंभराचें ( पुर ) प्रवेश करण्यास योग्य करून दिलें त्यावेळीं मी अतिथिग्व दिवोदासाचें रक्षण केलें.[१५]"

" हविर्दान करणाऱ्या दिवोदासासाठीं इन्द्रानें दगडांनीं बांधलेलीं शंभर पुरें फोडलीं [१६] ".

" ( हे अग्ने ) सोम पिळणाऱ्या व हविर्दान देणाऱ्या दिवोदासाला तूंहि पुष्कळ वरणीय ( धनें ) दिलीस[१७] ".

---

६ त्वं करञ्जमुत पर्णयं वधीस्तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी । १-५३-८

७ त्वमाविथ सुश्रवसं तवोतिभिस्तव त्रामभिरिन्द्र तूर्वयाणम् ।
त्वमस्मै कुत्समतिथिग्वमायुं महे राज्ञे यूने अरन्धनायः ॥ १-५३-१०

८ याभिर्महामतिथिग्वं कशोजुवं दिवोदासं शम्बर हत्य आवतम् ।
याभिः पूर्भिद्ये त्रसदस्युमावतं ताभिरूषु उतिभिरश्विना गतम् ॥ १-११२-१४

९ यदयातं दिवोदासाय वर्तिर्भरद्वाजायाश्विना हयन्ता ।
रेवदुवाह स च नो रथो वां वृषभश्च शिंशुमारश्च युक्ता ॥ १-११६-१८

१० दिवोदासाय महि चेति वामवः । १-११९-४

११ भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महिदाशुषे नृतो वज्रेण दाशुषे नृतो ।
अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत् ।
महो धनानि दयमाना ओजसा विश्वाधनान्योजसा ॥ १-३०-७

१२ दिवोदासाय नवतिं च नवेन्द्र पुरो व्यैरच्छाम्बरस्य ॥ २-१९-६

१३ अध्वर्यवो यः शतं शम्बरस्य पुरो बिभेदाश्मनेव पूर्वीः ।
यो वर्चिनः शतमिन्द्रः सहस्रमपावद्भरता सोममस्मै ॥ २-१४-६

१४ अध्वर्यवो यः शतमा सहस्रं भूम्या उपस्थेऽवपज्जघन्वान् ।
कुत्सस्यायोरतिथिग्वस्य वीरान्न्यवृणग्भरता सोममस्मै ॥ २-१४-७

१५ अहं पुरो मन्दसानो व्यैरं नव साकं नवतीः शम्बरस्य ।
शततमं वेश्यं सर्वताता दिवोदासमितिथिग्वं यदावम् ॥ ४-२६-३

१६ शतमश्मन्मयीनां पुरामिन्द्रो व्यास्यत् । दिवोदासाय दाशुषे ॥ ४-३०-२०

१७ त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते । भरद्वाजाय दाशुषे । ६-१६-५











" ( हे इन्द्रा ) तुझें तें केलेलें कृत्य आज देखील प्रसिद्ध आहे; ज्यानें तूं कुत्स, आयु आणि अतिथिग्व यांच्यासाठीं पुष्कळ हजार शत्रूंना कापून काढलेस. पृथ्वीच्या लोभानें तुर्यवाणावर ( सुश्रवसावर ) हल्ला करतांच त्याला उचलून धरलेस. [18]"

"आम्ही अग्नीच्या सन्मुख जातो; जसा सत्पति, भारत वंशांतील, शत्रूंना ठार करणाऱ्या, बहुदान करणाऱ्या दिवोदासाच्या सन्मुख जात असे. [19]

" अतिथिग्वाला सुखी करण्यासाठीं तूं मर्महीन ( शम्बराचें ) डोकें कापून काढलेस. [20] "

" हे शूर इन्द्रा हजारोंना कापून काढून स्तुत्य असें प्रसिद्ध हिंसक कर्म केलेंस. दास शम्बराला पर्वताखालीं लोटून ठार मारलेस ( आणि ) अनेक विचित्र पालक शक्तींनीं दिवोदासाचें रक्षण केलेस. [21]"

" ( हे इन्द्रा ) तूं शम्बर दस्यूची, ज्यांना जोड नाहीं अशीं शंभर पुरें फोडलीस, त्या वेळीं सोमानें विकत घेतल्या जाणाऱ्या प्रज्ञावान् इन्द्रा, आपल्या बुद्धिमत्तेनें, सोम पिळणाऱ्या, हविर्दान करणाऱ्या, तुझें स्तवन करणाऱ्या, दिवोदासाला द्रव्य दिलेंस [22]"

" ( हे इन्द्रा ) ज्या ( सोमाच्या ) मदात शम्बराला दिवोदासासाठी ठार मारलेस तो हा सोम तुझ्यासाठीं पिळला आहे ( तो तूं ) पी. [23] "

" ह्या सरस्वतीनें, वेगवान् ऋण फेडणारा, दिवोदास ( नांवाचा मुलगा ) हविर्दान करणाऱ्या वध्र्यश्वाला दिला. जिनें स्वार्थी पणींना कायमचें खणून काढलें. हें सरस्वती तुझी तीं दानें फार मोठीं होत. [24] "

" हे श्रेष्ठ मरुतांनो ह्याच्यावर ( सुदासावर ) त्याचा बाप दिवोदासाप्रमाणें लक्ष ठेवा, तुमच्या सेवेत तत्पर असलेल्या पैजवानाच्या गृहाचें रक्षण करा. कधींहि शिथिल न होणारें त्याचें बल अविनाशी असो. [25] "

" हे मघवन् तुझें अभिष्ट चिंतणारे तुझे प्रिय व सखे आम्ही घरीं सुखानें राहोत. अतिथिग्वाला सुखी करण्यासाठीं तुर्वश आणि याद्व यांना शासन कर. [26] "

" हे इन्द्रा ( स्तुतीनें ) अतिशय वर्धमान झालेला तूं प्रतिदिवशीं आयु, कुत्स आणि अतिथिग्व दिवोदास यांना ( वर मागा, वर मागा म्हणून ) त्रास देत होतास त्या तुला हर्यश्व शतक्रतुला अन्नकाम आम्ही आवाहन करतों. [27] "

" पुरें आणि ( पुरांचा स्वामी ) शम्बर यांना एकदमच, तसेंच प्रसिद्ध तुर्वश आणि यदु यांना दिवोदासाच्या काबूत आणून दिलेस [28] "

---

१८ प्र तत्ते अद्या करणं कृतं भूत्कुत्सं यदायुमतिथिग्वमस्मै ।
पुरू सहस्रा नि शिशा अभि क्षामुतूर्वं याणं धृषता निनेथ ॥ ६-१८-१३

१९ आग्निरगामि भारतो वृत्रहा पुरुचेतनः । दिवोदासस्य सत्पतिः ॥ ६-१६-१९

२० त्वं शिरो अमर्मणः पराहन्नतिथिग्वाय शंस्यं करिष्यन् ॥ ६-२६-३

२१ त्वं तदुक्थमिन्द्र बर्हणा कः प्र यच्छता शूरदर्षि ।
अव गिरेर्दासं शम्बरं हन्प्रावो दिवोदासं चित्राभिरूती ॥ ६-२६-५

२२ त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्था प्रतिनि दस्योः ।
अशिक्षो यत्र शच्या शचीवो दिवोदासाय सुन्वते सुतक्रे भरद्वाजाय गृणते वसूनि ॥ ६-३१-४

२३ यस्य त्यच्छम्बरं मदे दिवोदासाय रन्धयः ।
अयं स सोम इन्द्र ते सुतः पिब ॥ ६-४३-१

२४ इयमदाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे ।
या शश्वन्तमाचखादसं पणिं ता ते दात्राणि तविषा सरस्वती ॥ ६-६१-१

२५ इयं नरो मरुतः सश्चतानु दिवोदासं न पितरं सुदासः ।
अविष्टना पैजवनस्य केतं दूणाशं क्षत्रमजरं दुवोयु ॥ ७-१८-२५

२६ प्रियास इत्ते मघवन्नभिष्टौ नरो मदेम शरणे सखायः ।
नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शस्यं करिष्यन् ॥ ७-१९-८

२७ य आयुं कुत्समतिथिग्वमर्दयो वावृधानो दिवे दिवे ।
तं त्वा वयं हर्यश्वं शतक्रतुं वाजयन्तो हवामहे ॥ ८-५३-२

२८ पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् । अध त्यं तुर्वशंयदुम् ॥ ९-६१-२



अनुक्रमणिका






"मी गुंगुसाठीं प्रजेमध्यें ( हविसाठी ) अन्न करणाऱ्या आणि शत्रूंना ठार मारणाऱ्या दिवोदासाचें अन्नाप्रमाणें रक्षण केलें. पर्ण यास ठार मारण्याचें युद्धांत तसेंच करञ्जास ठार मारण्याचें युद्धांत आणि शत्रूंची कत्तल उडविण्याचें मोठ्या युद्धांत माझेंच नांव प्रामुख्यानें ऐकूं येत होतें.[२९]"

ऋचांचे स्वरूप संपूर्णतः कळावें, त्यांतील देवांच्या स्तुती कशा स्वरूपाच्या आहेत आणि देवांच्या स्तुतींतून प्राथमिक आर्यांचा इतिहास कसा सांपडतो हें दिसावें म्हणून ऋग्वेदांतील श्रेष्ठ पुरुष दिवोदासाबद्दल माहिती देणाऱ्या सर्व ऋचा वर उद्धृत केल्या आहेत. त्यांत पहिल्या मंडलापासून दहाव्या मंडलापावेतों ऋचा आहेत. तिसऱ्या आणि पाचव्या मंडलांत दिवोदासासंबंधीं ऋचा नाहींत. त्याचें कारण तिसऱ्या मंडलांतील ऋचा विश्वामित्राच्या आहेत. वसिष्ठ आणि तृत्सु हे भारतवंशाचे पुरोहीत होते. भारतवंशांतील दिवोदासाचा मुलगा सुदास याचे कांहीं वेळ वसिष्ठाशी वैर होऊन त्यानें विश्वामित्रास आपला पुरोहित केला. ह्याच काळांत विश्वामित्रानें सुदासासाठीं ' अश्वमेध ' यज्ञ केला. तिसऱ्या मंडलांतील ५३ व्या सूक्तांत विश्वामित्रानें आपल्या कुशिक अनुयायांना दिग्विजयासाठीं सोडलेला सुदासाचा घोडा फार काळजीपूर्वक रक्षण करण्यासाठीं आदेश दिला. विश्वामित्राच्या साहाय्यानेंच सुदासानें किटक, प्रमगन्द व नैचाशाख यांच्यावर विजय मिळविला. एवढा अपवाद सोडला तर भारतवंश व त्याचे कुलपरंपरागत पुरोहीत वसिष्ठ व तृत्सु यांचे विश्वामित्राशीं सदैव वैर होतें आणि तेंहि अत्यंत विकोपास गेलें होतें. विश्वामित्रानें वसिष्ठास शाप दिल्याबद्दलच्या तीन ऋचांचे अध्ययन अध्यापन वसिष्ठ-गोत्रियांना वर्ज्य आहे. वसिष्ठगोत्रियांचा ऋग्वेद तीन ऋचांनीं कमी आहे. ह्या कारणामुळें तिसऱ्या मंडलांत दिवोदासाबद्दल ऋचा नाहींत हें युक्तच आहे. पांचवें मंडल ' आत्रेयाचें ' आहे. शक्यता अशी दिसतें कीं ' आत्रेय ' भारतवंशाचे कट्टे शत्रू पुरु, यदु, अथवा तुर्वश यांपैकीं कोणाचे पुरोहीत असून त्यांचेहि भारतवंशाशीं वैर असावें, आणि म्हणून पांचव्या सूक्तांतहि दिवोदासाचा उल्लेख नाहीं.

## पूर्वजांना प्राप्त झालेलें देवत्व

दिवोदासाबद्दल वर जी माहिती आली आहे ती इन्द्र, अग्नि, मरुत् आणि अश्विनौ या चार देवांच्या स्तुतीपर ऋचांतून आली असून ती अगदींच स्थूल स्वरूपाची आहे. दिवोदासानें शम्बराचीं नव्याणव पुरातन दगडांनीं बांधलेलीं पुरातन शहरें फोडलीं. वर्चिला ठार मारून त्याच्या हजारों लोकांची कत्तल केली. कुत्स, आयु आणि अतिथिग्व दिवोदास यांनीं हजारों ठिकाणीं दस्यूंना कापून काढलें. त्यांनीं तुर्वश वंशांतील तरुण सुश्रवसावर स्वारी केली त्यांत त्यांचा पराभव झाला. अशी स्थूल विधानें वारंवार तींच तीं ऋचांतून आलीं आहेत. त्यावरून ऋचाकारांना त्यांनीं रचलेल्या ऋचांतील वर्ण्य विषयाची प्रत्यक्ष माहिती होती असें बिलकूल दिसत नाहीं. त्यांत वर्णन केलेल्या गोष्टी घडल्यानंतर फार दूरच्या काळांत म्हणजे जेव्हां त्या गोष्टींबद्दल स्मृति मात्र कायम राहिली होती अशा वेळीं ऋचांची रचना झाली असावी.

वरील ऋचांवरून आणखीहि एक महत्त्वाची गोष्ट दिसते ती ही कीं ऋचांतून ज्या दिवोदासाचें वर्णन केलें आहे त्याला काळाच्या दूरपणामुळें पूज्यत्व प्राप्त झालें आहे. हीच गोष्ट ऋचांतून वर्णन केलेल्या सर्व पूर्व आर्यांबद्दलहि खरी आहे. त्यांनीं केलेल्या कृत्यांना दैवी स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें. त्यांच्या शहरें फोडण्याला, लूटमारींना, जाळपोळींना आणि कत्तलींना देवांनीं त्यांच्यासाठीं केलेलीं अचाट कृत्यें समजून तशीं वर्णनें ऋचांतून सर्वत्र केलेलीं आढळतात. यावरून ही ऋचा पूर्वआर्यांचे दासांशी संघर्ष झाल्यानंतर अनेक शतकांनीं रचल्या गेल्या हेंच सिद्ध होतें.

## दास आणि दुर्बल यांच्या विरुद्ध युद्धें

वरील ऋचांवरून आणखीहि एक गोष्ट निदर्शनास येईल. ज्या काळाचा इतिहास वरील ऋचांतून आला आहे त्या काळांत आर्यांच्या निरनिराळ्या जमाती दासांशी तर युद्ध करीत होत्याच; परंतु त्यांच्यापैकीं जो कोणी दुर्बळ असेल अशाशींहि इतर प्रबल राजे एकोपा करून युद्ध करीत व त्यानें दासांजवळून मिळविलेले प्रदेश, शहरें, संपत्ति वगैरे हिरावून घेण्याचा प्रयत्न करीत. अशीं दोन ठळक उदाहरणें ऋचांतून आढळतात. त्या-

२९ अहं गुङ्गुभ्यो अतिथिग्वमिष्करमिषं न वृत्रतुरं विक्षु धारयम् ।
यत्पर्णयघ्न उत वा करञ्जहे प्राहं महे वृत्रहत्ये अशुश्रवि ॥ १०-४८-८



अनुक्रमणिका







पैकीं पहिलें वरील दिवोदासाच्या ऋचांतून अनेक वेळां आलें आहे. तुर्वश वंशांतील पोरवय सुश्रवसावर कुत्स, आयु आणि अतिथिग्व दिवोदास या बलाढ्य राजांनीं एकत्र होऊन हल्ला केला. इन्द्राच्या कृपेनें तरुण सुश्रवसान त्यांचा पराभव केला. दुसरें उदाहरण दिवोदास मरण पावल्यावर तरूण सुदासावर पांच आर्य आणि पांच आर्यपूर्व जमातींनीं एकत्र होऊन स्वारी केली. या युद्धास ' दाशराज्ञ ' युद्ध म्हणतात. त्यांत वसिष्ठ आणि तृत्सु यांच्या मदतीनें सुदासाचा विजय झाला. काळ अस्थिर व अशांततेचा असल्यामुळें राज्यसत्ता कोणत्याहि कारणामुळें दुर्बल झाली कीं बलवान राजे एकत्र होऊन त्याच्यावर हल्ला करीत. अशा वेळीं पुरोहीत आणि त्याचे अनुयायी राजास फार महत्त्वाची मदत करून आपल्या यजमानाचें राज्य आणि सत्ता कायम टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते असें दिसतें. दासांबरोबर झालेल्या युद्धांतहि विजय मिळविण्याचें कामांत पुरोहितांचा फार मोठा वाटा होता असें दिसतें. राजकारणांत पुरोहितांची कर्तबगारी व वर्चस्व फार असें. त्या मानानें युद्धांत मिळविलेल्या संपत्तींत त्यांचा वांटाहि फार मोठ्या प्रमाणांत असे. ' दाशराज्ञ ' युद्ध जिंकल्यावर ' आनवांचे ' सर्व राजवाडे तृत्सूंना दिले गेले. यमुना तीरावरील प्रदेश भेदाचे ताब्यांत होता. तृत्सूंनीं त्याचा पराभव करून त्यास ठार मारल्यावर अज, शिग्रु आणि यक्षु यांनीं घोड्यांचा मोठा करभार तृत्सूंना दिला. युद्धांत दासांकडून मिळविलेल्या संपत्तींतहि पुरोहितांचा फार मोठा वाटा असे. यज्ञांतील दक्षिणा म्हणून त्यांना गायी, बैल, मस्त सांड, उंट, द्रव्य, सोनें, हिरे, माणके मौल्यवान रथ आणि सुंदर स्त्रिया यांची कल्पनांतीत मोठी आणि मौल्यवान दानें मिळत. ऋचांतून पूर्वआर्यांच्या विजीगिषेचीं वर्णनें जशीं आढळतात तशींच पूर्वऋषींना मिळालेल्या दानांच्या स्तुतींचीं वर्णनेंहि प्राचुर्यानें आढळतात. हीं दानस्तुतींचीं वर्णनें अत्यंत मनोरंजक व तत्कालीन स्थितीवर प्रकाश पाडणारीं आहेत. आर्यांचीं एकमेकांची राज्यें काबीज करण्यासाठीं आपसांतील युद्धें आणि त्यांनीं पुरोहितांना दिलेलीं मोटमोठीं दानें यावरून प्रामुख्यानें एक गोष्ट निदर्शनास येते कीं, ज्या काळाचा इतिहास ऋचांतून आढळतो त्या काळांत आर्यांनीं राज्यें स्थापन केलीं असून ते अत्यंत मोठीं दानें देण्याइतकें समृद्ध होते. दिवोदासाचा सप्तति नावाचा पुरोहित असून तो त्यास अशींच मोठीं दानें देत होता ही गोष्ट वर ऋचा ६-१६-१९ मध्यें आलीच आहे. ही स्थिति प्राप्त होण्यास आर्यांनीं भारतांत प्रवेश केल्यानंतर कांहीं काळ लोटला असावा हे निश्चित. परंतु तो नक्की किती असावा हे सांगणें कठीण आहे. एवढी प्रगती होण्यास कमीत कमी एक शतकाची तरी जरूरी आहे.

## पूर्व ऋषी व नूतन ऋषी

ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांची निर्मिती भारतांत आर्यांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर अनेक ( कमींत कमी चार ) शतकांनीं झाली असें मानण्यास आणखीहि एक सबळ कारण आहे. ऋचांतून पूर्व ऋषी व नूतन ऋषी असा फरक सर्वत्र आढळतो. ऋग्वेदांत वर्णन केलेल्या ऋजिश्वन्, कुत्स, अतिथिग्व दिवोदास, सुदास, पुरुकुत्स, त्रसदस्यू इत्यादि पूर्वआर्यांच्या समकालीन ऋषींचा पूर्वऋषी म्हणून ऋचांतून अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केलेला आढळतो. ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचा रचणारे ऋषी स्वतःला नूतन ऋषी म्हणवून घेतात. ऋग्वेदाची सुरुवात ' अग्नि मीळे पुरोहितं ' या अग्नीच्या स्तुतिपर सूक्तानें झाली आहे. त्यांतील दुसऱ्या[३०] ऋचेचा अर्थ ' अग्निपूर्व ऋषींनीं स्तवन करण्यास योग्य तसाच नूतनांनीं देखील. तो देवांना येथें वाहून आणतो ( १-१-२ ). ' या ऋचेंत पूर्वऋषी आणि नूतनऋषी असा फरक करण्यांत आला आहे. ' पूर्वेभिः ' या शब्दांवरील सायणाचार्यांचें भाष्य ' पूर्वेभिः पुरातनैर्भृग्वङ्गिराप्रभृतिभिः ' असें असून ' नूतनैः उत ' या शब्दांवरील भाष्य ' इदानींतनैरस्माभिरपि ' असें आहे. ऋचाकार ' मधुच्छंदा वैश्वामित्रः ' स्वतःला नूतन ऋषि म्हणवून घेतो व पूर्वेभिः ऋषिभिः म्हणून पूर्वऋषींचा उल्लेख करतो. तसाच ऋचा[३१] ' ३-३२-१३ मध्येंहि पूर्व, मध्यम आणि नूतन

३१ यज्ञेनेन्द्रमवसाचक्रे अर्वागैनं सुम्नाय नव्यसे ववृत्याम् । यः स्तोमेभिर्वावृधे पूर्वेभिर्यो मध्यमे भिरुत नूतनेभिः ॥ ३-३२-१३








ऋचा असा ऋचांमध्यें भेद केला आहे. ती ऋचा अशी 'पूर्व, मध्यम आणि नूतन स्तुतींनी ज्याचा मोठेपणा वर्णिला आहे त्या इन्द्राला, नवीन धन मिळावें म्हणून, रक्षण करणाऱ्या यज्ञानें यजमान अभिमुख करून घेतात.' वरील ऋचेचा कर्ता स्वतःच्या स्तुतीला 'नूतन' स्तुति म्हणतो. ऋग्वेदांतील २ ते ७ मंडलांतील ऋचा सर्वांत जुन्या समजल्या जातात. वरील ऋचा ह्याच भागांतील असून देखील ऋचाकार स्वतःच्या स्तुतीला 'नूतन स्तोम' म्हणतो. ऋग्वेदांतील सर्वांत जुनी ऋचा देखील नूतन स्तुति गणली जाते. ऋग्वेदांतील सर्व ऋचा नूतन-स्तुती आहेत. ऋग्वेदाच्या प्रथम सूक्तांत आढळणारा पूर्व ऋषि आणि नूतन ऋषि हा फरक दशममंडला-पावेतों सर्वत्र आढळतो. ऋग्वेदांत पूर्वऋषींच्या नांवा-वर देखील कांहीं आर्षसूक्तें आढळतात. तीं देखील त्यांच्या रचनेवरून व भाषेवरून पूर्वऋषींच्या नांवा-वर नूतन ऋषींनींच रचलीं असावी असें दिसतें.

ऋग्वेदांतील ऋचाकार नूतन ऋषी पूर्वऋषींचा आदरयुक्त उल्लेख करतात. ऋचा[३२] १-४८-१४ मध्यें 'हे श्रेष्ठ उषा देवते तुला पूर्वऋषींनीं रक्षणासाठीं आणि अन्नासाठीं आवाहन केलें' असा पूर्वऋषींचा उल्लेख आहे. ऋचा[३३] १-६२-२ मध्यें 'ज्यानें (इन्द्रानें) आमच्या पदज्ञ ऋचाकार पूर्वपितर अङ्गि-रसांना गायीं मिळवून दिल्यांत' असा अङ्गिरसांचा 'पदज्ञ ऋचाकार पूर्व पितर' असा उल्लेख केलेला आढळतो. ऋग्वेदांतील ऋचांच्या रचनेच्या काळीं अङ्गिरसांना पूज्यत्व व काल्पनिक स्वरूप प्राप्त झालें असून त्यांच्या स्तुतिपर ऋचा ऋग्वेदांत अनेक आहेत. ऋचा[३४] १-१३९-९ मध्यें 'दध्यङ् आमचे पूर्व पितर अङ्गिरा प्रियमेध कण्व अत्रि आणि मनु हें प्राचीन विचारवन्त जाणावेत' असा उल्लेख आहे. ऋचा[३५] ३-५५-२ मध्यें 'हे अग्ने देव आमच्या चांगल्या गोष्टींचा नाश न करोत; पदज्ञ पूर्वपितर आमच्या बऱ्याचा नाश न करोत.' असा पदज्ञ पित-रांचा देवांबरोबर उल्लेख केला आहे. ऋचा[३६] ५-३-८ मध्यें 'हें अग्ने तुला ह्याच निशान्त प्रभाती पूर्वऋषींनी देवांचा दूत करून हविर्द्रव्यानें तुझें यजन केलें' असा पूर्वऋषींचा उल्लेख आहे. तसेंच ऋचा ५-२५-२ मध्येंहि पूर्वऋषींनीं अग्नीचें हवन केल्याचें वर्णन आहे. ऋचा ६-१९-४ मध्यें आमच्या पूर्वग्तोल्यांनी (पूर्वे जरितारः) जसें तुझें स्तवन केलें तसेंच आम्हीहि करतो असें वर्णन आहे. ऋचा ६-२२-२ मध्यें 'आमचे पूर्व पितर नवग्व' असा नवग्वांचा पूर्वपितर म्हणून उल्लेख आहे. ऋचा[३७] ७-२२-९ मध्यें 'ज्या पूर्वऋषींनीं आणि ज्या नूतन विप्रांनीं इन्द्राच्या स्तुती निर्माण केल्यात' असा प्राचीन ऋषींचा व नूतन विप्रांचा उल्लेख केला आहे. ऋचा ७-५३-१ मध्यें 'पूर्वे कवयो गृणन्तः' 'स्तवन करणारे पूर्वकवि' असा पूर्व-कवींचा उल्लेख आहे. ऋचा १०-१४-२ व ७ मध्यें 'नः पूर्वे पितरः' 'आमचे पूर्व पितर' म्हणून पूर्वऋषींचा उल्लेख केला आहे. ऋचा १०-१४-३ व १०-९८ ९ मध्येंहि पूर्वऋषींचा उल्लेख आला आहे. ऋचा १०-८२-४ मध्यें 'पूर्वे जरितारः' 'पूर्व स्तुति-कार' असा पूर्वऋषींबद्दल उल्लेख आहे.

### प्राथमिक व माध्यमिक ऋचा नष्ट झाल्या

पूर्वऋषी आणि नूतन ऋषी असा फरक ऋग्वेदाच्या प्रथम मंडलापासून दशम मंडलापावेतों सर्वत्र आढ-ळतो. पूर्व आर्यांच्या समकालीन ऋषींना पूर्व-ऋषी असें आदरानें संबोधिलें असून ऋग्वेदांतील मन्त्रकर्त्या ऋचाकारांना नूतन ऋषी असें संबोधिलें आहे. ऋग्वे-दांत संकलित केलेल्या सर्व ऋचा नूतन ऋषींच्या नूतन स्तुती आहेत हें वरील उताऱ्यांवरून स्पष्ट होईल. ऋग्वे-दांत संकलित केलेल्या नूतन ऋचा निर्माण होण्यापूर्वी पूर्व ऋचा व मध्यम ऋचाहि निर्माण झाल्या हें ऋचा

३२ ये चिद्धि त्वामृषयः पूर्व ऊतये जुहुरेऽवसे महि। १-४८-१४

३३ येनानः पूर्वे पितरः पदज्ञा अर्चन्तो अङ्गिरसो गा अविन्दन्। १-६२-२

३४ दध्यङ्हमे जनूषं पूर्वो अङ्गिराः प्रियमेधः कण्वः अत्रि मनुर्विदुस्ते मे पूर्वे मनुर्विदुः॥ १-१३९-९.

३५ मो षू णो अत्र जुहुरन्त देवा मा पूर्वे अग्ने पितरः पदज्ञः॥ ३-५५-२

३६ त्वामस्या व्युषि देव पूर्वे दूतं कृण्वाना अयजन्त हव्यैः॥ ५-३-८

३७ ये च पूर्वऋषयो ये च नूत्ना इन्द्र ब्रह्माणि जनयन्त विप्राः॥ ७-२२-९








३-३२-१३ वरून पाहिलेंच आहे. पूर्वऋषींना 'पदज्ञाः' (पद जाणणारे), 'अर्चन्तः' (ऋचा करणारे), 'जरितारः' (स्तोत्र करणारे), 'गृणन्तः' (स्तवन करणारे), 'कवयः' (क्रान्तदर्शी) व 'ब्रह्माणि जनयन्तः' (प्रार्थना निर्माण करणारे) असें म्हटलें आहे. त्यावरून ह्या पूर्वऋषींनींहि ऋचा रचल्या असाव्यात हें निश्चित. ह्या पूर्व आणि मध्यम ऋचांची ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांच्या निर्मितीच्या काळापावेतों जोपासना न होऊन त्या नष्ट झाल्या असाव्यात असें दिसतें.

असें मानण्यास दुसरेंहि एक महत्त्वाचें कारण आहे. तें असें कीं, ऋग्वेदांतील प्रथम मंडलापासून दशममंडलाच्या अंतापावेतों सर्व ऋचांतून ऋचांची प्रथमावस्था अथवा मध्यमावस्था दिसत नसून परिणतावस्थाच नजरेस येते. ऋग्वेदांतील ऋचांची रचना झाली त्या काळांत छंदःशास्त्र कळसास पोहोंचलें होतें हें ऋचांतून वापरलेल्या अनेकविध अक्षरछंदांवरून स्पष्ट होतें. तसेंच ऋचांची भाषा देखील प्रगल्भ असून योग्य कर्णमधुर शब्दांची निवड, उत्तमोत्तम उपमांचा उपयोग इत्यादि गोष्टीवरून ऋचांतील भाषेचीहि परिणतावस्थाच दिसून येते. ऋचांतील विचार देखील भारदस्त व अनेकविध आहेत. ह्या सर्व गोष्टी ऋचांची परिणतावस्थाच दाखवितात. ही परिणतावस्था प्राप्त होण्यासाठीं ऋचांच्या सुरुवातीपासून अनेक शतकांचा काळ लोटला असावा. ह्या काळांत निर्माण झालेल्या प्राथमिक आणि माध्यमिक ऋचांची जोपासना झाली नाहीं असें दिसतें.

## आर्यपूर्वांच्या भाषेचा व संस्कृतीचा प्रभाव

ऋग्वेदांत संकलित केलेल्या सर्व ऋचा भारतांतच आर्यांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर बऱ्याच काळानें (चार शतकांनीं) निर्माण झाल्या हें दाखविणारें दुसरेंहि महत्त्वाचें कारण आहे. ऋचांवर तत्कालीन आर्यपूर्व लोकांच्या भाषेचा आणि संस्कृतीचा फार मोठ्या प्रमाणावर प्रभाव पडलेला दिसतो. आर्यपूर्व लोकांच्या भाषेंतील शब्द, वाक्-प्रकार व उच्चार ऋचांतून प्राचुर्यानें आले आहेत. व्यापारी पणींचे 'पिशा' (पैसा), निम (अर्धा), बे (दोन) सारखे अनेक शब्द ऋचांतून आढळतात. ते मूळच्या भाषेंतून घेतले असावेत. मूळच्या शब्दांचे संस्कृतीकरणहि फार मोठ्या प्रमाणावर झालेलें दिसतें. आर्यपूर्व लोकांचे देव, धर्म, सामाजिक रचना, चालीरीति इत्यादि गोष्टींचाहि फार मोठ्या प्रमाणावर परिणाम झाल्याचें ऋचांतून आढळून येतें. त्याचा साकल्यानें विचार वेगळ्या ठिकाणीं करूं. संस्कृतीचें संमीलन होऊन संयुक्त संस्कृति निर्माण होण्यास कांहीं शतकांच्या कालावधीची जरूर असते. संयुक्त संस्कृतीचें चित्र ऋचांतून स्पष्टपणें दिसतें. यावरूनहि ऋग्वेदांतील ऋचांची निर्मिति आर्यांनीं भारतांतील आपल्या शत्रूंना जिंकून आपली सत्ता प्रस्थापित केल्यानंतर कित्येक शतकांनीं झाली असावी हीच गोष्ट सिद्ध होते.

## मूलस्थानाचा विसर

ऋग्वेदांत संकलित केलेल्या सर्व ऋचा भारतांतच निर्माण झाल्या आहेत याचें आणखीहि एक महत्त्वाचें गमक आहे. ऋच्या निर्मितीच्या कालीं आर्य नुकतेंच भारतांत आले असते आणि त्यांना त्यांच्या मूलस्थानाबद्दल माहिती असती तर आर्यांच्या मूलस्थानाचें नांव आणि त्या प्रदेशाचें वर्णन ऋचांतून आल्याखेरीज राहिलें नसतें. परंतु आर्यांच्या मूलस्थानाचें नांव अथवा तेथील प्रदेशाचें वर्णन ऋचांतून बिलकूल आढळत नाहीं. इतकेंच नव्हे तर भारताबाहेरील प्रदेशांचीं, नद्यांचीं अथवा लोकांचीं नांवें अथवा वर्णनें ऋचांतून बिलकूल आलेलीं नाहींत. ऋचांतून जीं भौगोलिक वर्णनें, लोकांची माहिती, नद्यांचा महिमा आणि पावित्र्य इत्यादींचीं वर्णनें आलीं आहेत त्यावरून ऋचाकारांना भारतच आपला देश वाटत होता व त्याबद्दल त्यांचे मनांत विलक्षण आत्मीयता व प्रेम होतें हें दिसून येईल. परक्या देशांतून आलेल्या आक्रमकांचें प्रेम ते ज्या भूमींतून आले तिच्याकडे आकृष्ट झालें असतें. असें ऋचांतून कांहींहि दिसत नाहीं. उलट, भारतीय नद्यांबद्दलची स्तुतिगर्भ रमणीय वर्णनें वाचलीं म्हणजे ऋचाकारांना त्यांच्याबद्दल अत्यंत प्रेम आणि आदर वाटत होता हें दिसून येतें. ऋचाकार आर्य भारतासच आपला देश समजत. यामुळें कांहीं विद्वानांनीं आर्यांचें मूलस्थान भारत अशा प्रकारचे चुकीचे वाद निर्माण केले. त्याच्या उलट ऋचांतून आर्यांच्या भारताबाहेरच्या मूलस्थानाचें वर्णन आढळतें असें दुसऱ्या कांहीं विद्वानांचे म्हणणें आहे. आर्यांच्या मूलस्थानाबद्दल अशा परस्पर-



अनुक्रमणिका

विरोधी व चुकीच्या कल्पना प्रसृत झाल्या आहेत. आर्य बाहेरून आले हें जितकें खरें तितकेंच ऋचांत तशा प्रकारचा कांहींहि उल्लेख नाहीं हेंहि खरें. आर्य जर भारताबाहेरून आले तर त्यांच्या मूलस्थानाबद्दलचा उल्लेख ऋचांतून सांपडणें अगदीं स्वाभाविक. परंतु तसा कोणताहि उल्लेख नसल्यामुळें विद्वानांना शिरोवेदना होणाऱ्या समस्या निर्माण झाल्या आहेत. परंतु नूतन ऋषींनीं रचलेल्या ऋग्वेदांत संकलित केलेल्या ऋचांच्या रचनेचा काल व आर्यांचा भारतांत प्रवेशाचा काल, यांतील अंतर लक्षांत घेतलें म्हणजे ऋग्वेदांतील ऋचांची रचना झाली त्यावेळीं नूतन ऋषींना आपल्या पूर्वजांच्या मूलस्थानाबद्दल व भारताबाहेरील हालचालींबद्दल कोणत्याहि प्रकारची माहिती असलेली दिसत नाहीं. ते भारतालाच आपला देश समजत. यावरूनहि हेंच सिद्ध होतें कीं, ऋग्वेदांत संकलित केलेल्या नूतन ऋषींनी रचलेल्या ऋचांची निर्मिति आर्यांनीं भारतांत प्रवेश केल्यानंतरच अनेक शतकांनी झाली.

ऋग्वेदांत संकलित केलेल्या नूतन ऋषींनीं रचलेल्या ऋचांची रचना दीर्घ कालपर्यंत चालत असावी असें ऋचांच्या भाषेतील आणि इतर फरकावरून दिसतें. ती किती शतकं चालली हें सांगणें कठीण आहे. परंतु इतकें मात्र निश्चित कीं, कांहीं ऋचा साध्या, प्राकृत आणि जुने शब्दप्रचुर तर कांहीं प्रौढ आणि संस्कृतला जवळच्या आहेत. यावरून हा काळ बराच मोठा असावा असें दिसतें.

ह्या सर्व गोष्टींची आणि ऐतिहासिक पार्श्वभूमीची यथायोग्य कल्पना असल्या शिवाय ऋचांचे अर्थ बरोबर आणि नीट समजत नाहींत.

---

## ग्रामदानाचा खरा अर्थ :

सारा समाज छिन्न भिन्न झाला आहे. स्त्री विरुद्ध पुरुष, हरिजनाविरुद्ध परिजन, ब्राह्मणाविरुद्ध ब्राह्मणेतर, तेलुगुविरुद्ध तामीळ, हिंदूविरुद्ध मुसलमान, कॉंग्रेसविरुद्ध पी. एस्. पी., गुरुविरुद्ध शिष्य, बापाविरुद्ध बेटा, उजव्या हाताविरुद्ध डावा हात, वामपक्षीविरुद्ध दक्षिणपक्षी. अशी ही सर्व समाज एकरस बनण्याची प्रक्रिया चालू नसून समाज फुटून विस्कळित होण्याची प्रक्रिया चालू आहे.

इंग्रज गेले आणि कॉंग्रेसचें राज्य आलें. पण फरक काय झाला ? राज्यव्यवस्था गेली तर आतां लोकव्यवस्था आली पाहिजे, शक्तीचे अधिष्ठान दिल्ली न राहतां खेडें बनलें पाहिजे. ही गोष्ट लक्षांत येत नाहीं. जुन्या राजांचा जो थाटमाट, तोच आमच्या राज्यपालादींचा. म्हणे स्टेटची शान राहिली पाहिजे ! अरे स्टेटची म्हणजे कोणाची ? आमची ना ? मग आमची शान कुठें आहे ? इंग्रजी सत्तेचें ओझें डोक्यांवर होतें म्हणून पळतां येत नव्हतें. आतां तें ओझें गेलें तर शरीराचेंच ओझें इतकें वाढलें आहे कीं पळतां येत नाहीं. किती अधिकारी, किती विभाग, किती नोकर, काय खर्च !! लोकांनीं सर्व सरकारवरच ढकलून दिलें आहे. परंतु देशाची ताकत वाढण्याचा हा कार्यक्रम नव्हे.

भूमिदान आणि ग्रामदान म्हणजे फक्त लोकांना जमिनी वाटून देण्याचा कार्यक्रम नाहीं. व्यक्तिगत मालकी जाऊन गांवाची सामूहिक मालकी करायची, गांवाची चिंता गांवानें करायची, गांवाची सुधारणाहि गांवानें करायची, आणि सरकारवर अवलंबून रहायचें नाहीं; हा आहे ग्रामदानाचा खरा अर्थ.

— विनोबा



अनुक्रमणिका







श्री. पांडुरंग देसाई

# पांडुरंग म्हणजे शिव

धारवाड जिल्ह्याच्या हिरेकेरूर् तालुक्यांत बाळंबीड नांवाचें लहान गांव आहे. हिरेकेरूर्पासून या गांवाचें अंतर सुमारें दोन मैल. गांवाच्या बाहेर सुस्थितींत नसलेलें एक शिवमंदिर आहे. आंतील लिंग मोठें असून जागृत दैवत म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. या देवाचें नांव विषपरिहारेश्वर. साप आणि इतर विषारी प्राण्यांची बाधा पावलेला माणूस या देवाच्या प्रभावानें रोगमुक्त होतो. हा शेंकडों लोकांचा प्रत्यक्ष अनुभव आहे.

## दोन महत्त्वाचे शिलालेख

या देवळांत चार शिलालेख आहेत. १९५२ च्या जानेवारी महिन्यांत बाळंबीड गांवीं जाऊन मी या शिलालेखांचा संग्रह केला. यांपैकीं दोन फार महत्त्वाचे असल्यामुळें त्यांचें सविस्तर विवेचन करतों.

पहिला शिलालेख कल्याणचे चालुक्यवंशीय सहाव्या विक्रमादित्य राजाच्या वेळचा असून त्याचा काळ तद्राज्यवर्ष बारावें, प्रभव संवत्सर म्हणजे इ. स. १०८८. यांतील मुख्य विषय पिरियकेरेयूर् (म्हणजे आजचें हिरेकेरूर्) गांवच्या एक हजार महाजनांसमक्ष 'श्रीपंडरंगेश्वर' देवाला दान दिलें हा आहे. शिलालेखांत 'पंडरंगेश्वर' या देवाच्या नांवाचा दोन वेळां उल्लेख येतो.

दुसरा शिलालेख देवगिरीचा यादव राजा सिंघणाच्या कारकीर्दींतला असून त्याचा काळ शक ११५०, सर्वधारि संवत्सर म्हणजे इ. स. १२२८. या शिलालेखांतहि त्याच देवाला दिलेल्या दानांचें वर्णन केलें आहे. यांत देवाच्या नांवाचा चार वेळां उल्लेख येतो. प्रथमतः स्तुतिपर पद्यांत त्याला 'पंडुरंगनाथ हर' असें संबोधिलें आहे. नंतर हा 'पंडरंग' पिरियतटाक म्हणजे हिरेकेरूर् गांवाच्या पश्चिम दिग्भागीं वास करून राहिला आहे असें वर्णिलें आहे. पुढें 'पंडरंगनाथा'च्या देवळाच्या बांधकामाचा उल्लेख येतो. शेवटीं 'पंडरंगदेवा'ला दान दिल्याचें सांगितलें आहे.

वरील विवेचनावरून शिलालेखांत किंचित् रूपभेदानें 'पंडरंगेश्वर,' 'पंडुरंगनाथ,' 'पंडरंग,' 'पंडरंगनाथ' आणि 'पंडरंगदेव' असें ज्या देवाला संबोधिलें आहे, तो देव शिव किंवा शंकर असून त्यालाच अलिकडच्या काळांत विषपरिहारेश्वर हें नांव प्रचारांत आलें आहे, या विषयीं मुळींच शंका रहात नाहीं. या शिवदेवाचें 'पंडरंग' हें नांव अकरापासून तेराव्या शतकापर्यंत सुमारें दोनशें वर्षें तरी प्रचलित व लोकमान्य झालें होतें असा निष्कर्ष निघतो.

हे शिलालेख वाचल्यानंतर बऱ्याच दिवसांपासून पांडुरंग-विठ्ठलाचें मूळ काय असावें याविषयीं माझ्या मनांत विचार घोळत होते. त्या विचारांना माझ्या समजुतीप्रमाणें कांहीं निश्चित स्वरूप आल्यामुळें ते वाचकांपुढें मांडतों.

## पांडरंगपल्ली-शिववाचक नांव

संस्कृतांत पांडर किंवा पांडुर म्हणजे पांढरें. पांड-(डु) र आणि अंग ह्या दोन शब्दांचा बहुव्रीहि समास होऊन पांड-(डु) रांग हा शब्द बनतो. पांड-(डु) रांग म्हणजे श्वेतकाय. श्रीशंकराचें हें एक वैशिष्ट्य. शिवाची देहकांति स्फटिकाप्रमाणें शुभ्र आहे असें संत कवींनीं वर्णिलें आहे. या कारणानें धवलप्रभेच्या शिवाला पांड-(डु) रांग हें नांव कांहीं भागांत प्रचलित झालें असावें. पांड-(डु) रांगाचें सहजसुलभ रूप पांड-(डु) रंग आणि पंडरंग. ही चिकित्सा लक्षांत घेतल्यास, हेमचंद्राच्या 'पंडरंग म्हणजे रुद्र' या विधानाचें स्पष्टीकरण होऊन पुष्टीहि मिळते.

पांडरंगपल्ली दानपत्राच्या आधारावर पंढरपुर हें स्थान इ. स. सहाव्या शतकाइतक्या प्राचीन काळापासून अस्तित्वांत होतें असें सिद्ध होतें. पांडरंगपल्ली हें नांव शिववाचक असावें. शिवपुर, शिवग्राम, शिवळ्ळी (शिवपल्ली), तसें पांडरंगपल्ली. अयोध्यापुरी या नांवांतून पुरी हा प्रत्यय वगळल्यास अयोध्या हें गांवाचें नांव शिल्लक राहतें. त्याप्रमाणें 'पल्ली' वर्ज्य केल्यास पांडरंग हें गांवाचें नांव उपयोगास येतें. पांडरंगाचें संक्षिप्त एकारान्त रूप पंडरंगे. मूलतः अकारान्त असलेलीं गांवांचीं नांवें एकारान्त झाल्याचीं उदाहरणें सांपडतात. उदाहरणार्थ, अनंतपुर जिल्ह्यांत (आंध्रराज्य) तेलंगीकरण झालेलें कोनकोंड्ल नांवाचें



अनुक्रमणिका

गांव आहे. अकरा-बाराव्या शतकांतील शिलालेखांत त्याचें कोण्डकुंदे हें जुनें कानडी नांव आढळतें. अधिक शोध केल्यास कोण्डकुंदे याचें मूळ कोण्डकुंद असावें असें प्रत्ययास येतें. आणखी उदाहरणें म्हणून बळ्ळकुंद-बळ्ळकुंदे (बळ्ळारी जिल्हा), मेळकुंद-मेळकुंदे (गुलबर्गा जिल्हा), हीं नांवें सांगतां येतील. कोण्डकुंदे हें प्रसिद्ध जैनगुरु कोण्डकुन्दाचार्य यांचें मूळ गांव होतें. याचें विवेचन 'Kondakunda, His Domicile' या माझ्या लेखांत केलें आहे (Journal of the Mythic Society, Vol. XLVI, pages 1–7). अकाराचा एकार होणें हा कानडी भाषेचा एक नियम म्हणून सांगतां येईल.

### पंडरंगेचा विठ्ठल

नक्की केव्हां हें सांगण्यास पुरावा नाहीं, पण स्थूलमानानें १०–११ व्या शतकाच्या सुमारास शिवाचें स्थान असलेल्या पांडरंग (पल्ली) या गांवीं पुंडरीक नांवाचा विष्णुभक्त प्रसिद्धीस आला असावा आणि त्यानें आपलें इष्ट दैवत विष्णु किंवा विठ्ठलाची त्या स्थळीं प्रतिष्ठा करून त्याची उपासना आरंभिली असावी. थोडया अवधींत या नवीन संप्रदायामुळें या भागांत शिवाचें महत्त्व कमी होऊन विष्णु किंवा विठ्ठलाला प्राशस्त्य आलें असावें. विठ्ठलाचा बोलबाला झाला तरी मूळ गांवाच्या नांवाचा विसर पडणें शक्य नव्हतें. या कारणांसाठीं पांडरंग– किंवा पंडरंगेचा विठ्ठल असाच या देवाचा उल्लेख होत राहिला. याची साक्ष पंढरपुरच्या होयसळ सोमेश्वराच्या शिलालेखावरून आणि हेब्बळळीच्या शिलालेखावरून पटते.

### पांडरंग म्हणजे विठ्ठल

याची पुढची पायरी म्हणजे भाषाशास्त्राच्या व्यावहारिक नियमाप्रमाणें पांडरंगाचें विठ्ठलाबरोबर समीकरण. नांव लांबलचक असलें तर त्याच्या पूर्वभागास किंवा उत्तर भागास फांटा देण्याची पद्धत आहे. उडपी हें गांवाचें नांव; येथील देव कृष्ण. उडपी-कृष्ण हें नांव उच्चारण्यास अडचण होतें म्हणून, कृष्णाला सोडून उडपीराव हें नांव स्वीकारण्यांत आलें. अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. आणखी एक परिचित उदाहरण, तिरुपति किंवा तिरुमलराव. तिरुपति किंवा तिरुमलै हें क्षेत्र; तेथील देव वेंकटेश. पण क्षेत्रालाच देव समजून क्षेत्राचें नांव व्यक्तीस देण्यांत आलें. असाच कांहींसा प्रकार पांडरंग आणि विठ्ठल या नांवांमध्यें झाला असावा. दुहेरी पांडुरंग-विठ्ठल बोजड वाटल्यामुळें विठ्ठल मागें राहिला आणि देव म्हणून क्षेत्राचें नांव पांडरंग प्रख्यातीस आलें. पुढें पांडरंग हें क्षेत्र आणि विठ्ठल हा देव यांतील भेद लुप्त होऊन पांडरंग म्हणजे विठ्ठल आणि विठ्ठल म्हणजे पांडरंग, हें समीकरण सिद्ध झालें.

### पांडुरंगाच्या दोन अवस्था

पुराणवस्तु-आणि इतिहास संशोधनाच्या क्षेत्रांत मीं थोडेंसें काम केलें आहे. पंढरपुर आणि तेथील विठ्ठलमंदिराचा मला अल्प परिचय आहे. विठ्ठलमूर्तीचें मी परीक्षण केलेलें नाहीं. पण संशोधक मित्रांनीं केलेली चिकित्सा पाहतां आजची मूर्ति फार प्राचीन नाहीं हें मत सयुक्तिक वाटतें (प्रसाद मासिकाच्या १९५६ डिसेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झालेला श्री. चिं. ग. कर्वे यांचा 'विठ्ठलमूर्तीची संशोधकीय मीमांसा' हा लेख पहावा). विठ्ठलमंदिराच्या कोणत्याहि जुन्या भागाचा काळ ११ व्या शतकाच्या मागें जात नाहीं असें तेथील शिल्पकलेवरून सूचित होतें. श्री. बहिरट म्हणतात त्याप्रमाणें (साधना, २९-९-१९५६, 'पंढरीची प्राचीनता' हा लेख) सातव्या किंवा सहाव्या शतकाइतकें प्राचीन चालुक्य शिल्पावशेष या प्रदेशांत मिळणें दुस्तर आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें विचार केल्यास पंढरपूर या स्थानांत पांडुरंगाच्या दोन अवस्था किंवा पांडुरंगाचे दोन अवतार माझ्या मनश्चक्षूपुढें उभे राहातात. पहिला अवतार पांच किंवा सहाव्या शतकापासून दहाव्या किंवा अकराव्या शतकापर्यंत. हा पांडुरंग शिवस्वरूपी होय. दुसरा अवतार अकराव्या शतकानंतर अस्तित्वांत येतो. हा पांडुरंग विष्णुस्वरूपी आहे. या लेखांतील माझें विवेचन शिवस्वरूपी प्रथम पांडुरंगाला अनुलक्षून आहे.

असले विषय पुराणतत्त्वसंशोधकाला अपूर्व वाटत नाहींत. भारतीय कालपुरुषानें अनेक धर्म-पंथांचे अस्त व उदय पाहिले आहेत. बौद्ध किंवा जैनमंदिरें उध्वस्त होऊन त्यास्थळीं शिवमंदिरांची स्थापना होणें, शिवालयें जाऊन विष्णुदेवालयें प्रख्यातीस येणें, देवळांचा नायनाट होऊन मशीदी उभारणें, यासारख्या घडामोडींचीं अनेक उदाहरणें आमच्या देशांत आढळतात.









तरी पढरीच्या असाधारण प्रसिद्धीमुळें येथील संशोधनाला एक प्रकारचें विशिष्ट महत्त्व प्राप्त झालें आहे.

देवाच्या उपासनेचे अनेक मार्ग आहेत. त्यांत सत्यशोधन हाहि एक मार्ग आहे अशी माझी श्रद्धा आहे. डोळे झांकून देवाचें दर्शन घेण्यापेक्षां डोळे उघडून डोळसपणानें देवाला पाहावयास शिकावें असें मला वाटतें.

पण नदीमूळ आणि ऋषिकुळ तसें देवाचें मूळ शोधूं नयें असें वडील माणसें सांगतात. पंधरा वर्षांपूर्वी पंढरपुरांत पांडुरंग देवालयाची पाहाणी करीत असतां, एक भक्त संतापून माझ्यावर ओरडले. " अहो राव ! हें वैकुंठ आहे, बरें कां ? येथें तुमच्या सारख्या संशोधकांची मात्रा चालत नाहीं. " हे शब्द अद्याप माझ्या कर्णरध्रांत घुमत आहेत. त्यांत सत्यांश नाहींच असें म्हणवत नाहीं.

या वर्गाच्या भक्तांच्या दृष्टीनें पांडुरंगाचें मूळ पाहाण्याचा हा माझा प्रयत्न अपराध ठरेल. माझ्या या लेखानें कांहीं भक्तांच्या भावना दुखावल्या जाण्याचा संभव आहे. या माझ्या अपराधांसाठीं कोट्यवधि भक्तांच्या हृदयान्तरंगांत वास करणाऱ्या श्रीपांडुरंगरूपी परमेश्वराच्या चरणकमलीं क्षमा याचना करून हें लिखाण संपवितों. जय विठ्ठल.

---

## विजय ....

आसऱ्यासाठीं भटकतें मन सांतात अनंतात
पण नाही कुठेंच मुळीं दार उघडें
सूर्यचंद्रासंगें भटकुन रखडुन
विज्ञानाची दरी तुडवुन

अध्यात्माचा समुद्र पोहुन
अखेर मनाचें दुखतें अंग दुखतात पाय
आपल्याच हातांनी जरा चेपुन
आपल्याच घरांत परततें मन

' मिळवल्याच्या ' ' समाधानांत ' असणाऱ्यांनो
अशा मनाला हंसूं नका
त्यांतच त्याचा विजय आहे ...

– दत्ता कदम

## अध्ययनशीलतेची आवश्यकता :

विद्या मार्गदर्शनाचें कार्य करीत असल्यामुळें प्रत्येकाला विद्येची गरज आहे. परंतु हल्लीं असा समज पसरला आहे कीं, विद्याप्राप्ति लहान मुलांचें काम आहे. कॉलेजची डिगरी मिळाली कीं विद्या आटोपली ! खरें पाहिलें तर कॉलेज संपल्यावरच विद्येची सुरुवात होते. विद्या कशी प्राप्त करावी ह्याचें शिक्षण संपून विद्यार्जनासाठीं आपण स्वावलंबी झालों असा त्याचा अर्थ आहे.

म्हणून प्रत्येकानें आमरण विद्यार्थी असलें पाहिजे. परंतु मी असें पाहतों कीं, वकील, डॉक्टर, व्यापारी, सरकारी नोकरवर्ग, इत्यादि कोणीच खास अध्ययन करीत नाहींत. राजकारणांत पडलेले लोक देखील अध्ययन करीत नाहींत. कॅांग्रेसनें जाहीर केलें आहे कीं, देशांत आम्ही समाजवादी रचना स्थापना करूं. परंतु समाजवादी रचना म्हणजे काय हें किती लोकांना सांगतां येईल. समाजवादी, साम्यवादी, किंवा साम्राज्यवादी रचनामध्यें काय फरक आहे याचें अध्ययनच लोक करीत नाहींत, ते म्हणतात या सगळ्या गोष्टींचें चिंतन करण्याची जबाबदारी नेत्यांची आहे.

वास्तविक पाहतां स्वराज्यानंतर अध्ययनशीलता वाढली पाहिजे. अनेक विषयांचे आणि भाषांचे तज्ज्ञ, त्याचप्रमाणें समाजशास्त्र, सृष्टिशास्त्र, इत्यादि अनेक शास्त्रांचे तज्ज्ञ आपल्या देशांत असले पाहिजेत. परंतु हें सर्व अध्ययनाशिवाय कसें होणार ? पूर्वी जेंव्हां आपला देश वैभवाच्या शिखरावर होता तेंव्हां देशांत अध्ययन करणारे लोक होते.

– विनोबा











प्राचार्य र. म. भुसारी

# यादव-कालीन महाराष्ट्र – ब्राह्मण समाज

मग वर्णीमाजीं छत्रचामर । स्वर्ग जयाचें अग्रहार ।
मंत्रविद्येसी माहेर । ब्राह्मण जे ॥
पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार सावयव ।
सकळ तीर्थासी देव । उदयले जे ॥ ज्ञानेश्वरी, ९–४७५–६

ज्या ब्राह्मणांनीं पैठण सारख्या विद्येच्या केंद्रांत ज्ञानेश्वरादि भावण्डांचा लहानपणीं तीं संन्याशाचीं मुलें म्हणून छळ केला त्या ब्राह्मणवर्गाचा ज्ञानेश्वरांनीं चातुर्वर्ण्याचे राजे, स्वर्गाचे धनी, विद्येचे माहेर आणि या भूलोकींचे देव असा मोठ्या गौरवानें उल्लेख करावा यांत त्या संतश्रेष्ठाच्या मनाचा थोरपणा आणि "अद्वेष्टा सर्वभूतानाम्" ही साधुवृत्ति तर दिसून येतेच, पण त्या बरोबरच यादवकालीन समाजांत ब्राह्मणांचें स्थान किती उच्च होतें याचाहि बोध होतो. यादवांचे दानलेखहि यांस पोषक असेच आहेत. या लेखांवरून सेऊण यादवापासून देवगिरीच्या शेवटच्या वैभवशाली रामदेवापर्यन्त बहुतेक सगळ्या राजांनीं विद्वान् ब्राह्मणांना अग्रहार देऊन त्यांचा योगक्षेम चालविला होता असा दाखला मिळतो. ब्राह्मणांना आश्रय देण्याची ही परंपरा चालुक्याच्या व राष्ट्रकूटांच्या आमदानींतहि दिसून येते. इतकेंच नव्हें तर यादव-समकालीन शिलाहार आणि दक्षिणेंतील इतर राजांनीं देखील हेंच धोरण अवलंबिलें होतें असें त्यांच्या दान-शासनावरून आढळून येतें. यावरून स्मृतिकारांनीं विद्वान् ब्राह्मणांच्या बाबतींत घालून दिलेल्या नियमां-ची राजेलोक अंमलबजावणी करीत असत असें दिसतें. गौतम, याज्ञवल्क्य आणि अत्रि या स्मृति-ग्रंथांत श्रोत्रिय पण निर्धन ब्राह्मणांचा योगक्षेम चाल-विणें किंवा त्यांना आश्रय देणें हें राजाचें कर्तव्य आहे अशीं वचनें आहेत. मनुस्मृतींत तर याहि पुढें जाऊन असें सांगितलें आहे कीं, ज्या राज्यांत एखादा विद्वान ब्राह्मण उपाशी मरेल त्या राज्यावर दुष्काळ आणि रोगराई यांसारखीं संकटें येतील.

## पक्षपात नव्हे

यावरून धर्मशास्त्रकार ब्राह्मणांचे पक्षपाती होते असें समजूं नये. इतर वर्णांना आणि जातींना चरितार्था-साठीं वेदपठण अथवा शास्त्राध्ययन यांखेरीज इतर सर्व व्यवसाय आणि धंदे स्वीकारण्याची शास्त्रकारांनीं अनुज्ञा दिली होती. परंतु, ब्राह्मणांना आपत्काळ वगळल्यास इतर वेळीं विद्याधनाखेरीज इतर धन संपादन करण्यास स्मृतिकारांनीं फार कडक बंधनें घातलीं आहेत. आणि संकटकाळीं देखील त्यांनीं द्रव्यार्जनाची हांव न बाळगतां अल्पसंतुष्ट असावें असें स्मृतिकार सांग-तात. प्रतिग्रह हें चरितार्थाचें साधन या दृष्टीनें शास्त्र-कारांनीं ब्राह्मणांना अनुसरण्याला योग्य म्हणून सांगि-तलें आहे. तथापि, त्या बाबतींत देखील बरींच बंधनें घातलीं आहेत. फक्त योग्य आणि शुद्ध आचरण असलेल्या उच्चवर्णीय पुरुषापासून ब्राह्मणानें दान घ्यावें असें शास्त्रवचन आहे.

प्राचीन कालापासून ब्राह्मण आणि विद्या यांचें साहचर्य आहे. त्यामुळ विद्वान ब्राह्मणांना समाजांत साहजिकच मान असे. चातुर्वर्ण्याचें रक्षण आणि वेद-शास्त्राच्या अध्ययन-अध्यापनाची अविच्छिन्न परंपरा ब्राह्मण वर्गानें अकिंचन वृत्तीनें राहून शेंकडों वर्षें चालविली म्हणून समाजानें त्या वर्गाला अग्रपूजेचा मान दिला ही गोष्ट खोटी नाहीं. "वर्णानां ब्राह्मणो गुरुः" अथवा भूदेव हीं आदरार्थी वचनें यादवकालां-तच नव्हे तर वेदकालांत देखील आढळतात. या वच-नांना अनुसरून यादवराजांनीं वैदिक संस्कृतीबरोबरच या थोर परंपरेचें रक्षण केलें याबद्दल त्यांच्या दानशास-नांत अनेक दाखले मिळतात. भास्कराचार्य, चांगदेव,



अनुक्रमणिका





वाचस्पतिमिश्र, अमलानंद, वोपदेव आणि हेमाद्रि या प्रसिद्ध व्यक्ती याच थोर परंपरेंतून निर्माण झाल्या. विशेषत: विज्ञानेश्वर, अपरार्क आणि हेमाद्रि हे धर्मशास्त्रकार महाराष्ट्राच्या मध्ययुगीन कालांत या चातुर्वर्ण्यमूलक संस्कृतीचे मोठे आधारस्तंभ मानले जातात.

**वेदशाखा आणि पोटजाती**

प्राचीनकालीं यज्ञयागामुळें ब्राह्मणांचा वेदविद्येशीं घनिष्ठ संबंध येत असे. यज्ञासाठीं चारहि वेदांचें अध्ययन केलेले ब्राह्मण आवश्यक असत. या अध्ययनवैशिष्ट्यामुळें आरंभीं आरंभीं ब्राह्मणवर्णांत चार भेद निर्माण झाले असावेत. पुढें वैदिक धर्माचा प्रसार भारतवर्षांत जसजसा चोहोंकडे होत गेला तसतसा ब्राह्मणांचा वर्ग यज्ञयाग आणि पौरोहित्य यांसाठीं दूरदूरच्या भागांत स्थायी झाला असावा. त्यामुळें उच्चारभेद, पाठभेद आणि आचारभेद निर्माण झाले. त्याचा परिणाम असा झाला कीं, एकेका वेदाच्या अनेक शाखा अस्तित्वांत आल्या. महाभाष्यकार पतंजलीच्या कालीं म्हणजे इ. स. पूर्व १५० च्या सुमारास "एकशतं अध्वर्युशाखा, एकविंशतिधा बाह्वृच्यं, सहस्रवर्त्मा सामवेदो, नवधा अथर्वणो वेद" म्हणजे, यजुर्वेदाच्या शंभर, ऋग्वेदाच्या एकवीस, सामवेदाच्या हजार आणि अथर्वणाच्या नऊ शाखा अस्तित्वांत होत्या. यांपैकीं यादवांच्या कालांत किती शिल्लक राहिल्या होत्या हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. तथापि, यादवांच्या दानलेखांत पुढील शाखांचे उल्लेख आढळतात:-

१- ऋग्वेदी : शाकलशाखा.

२- शुक्लयजुर्वेदी : काण्व आणि माध्यंदिन.

३- कृष्णयजुर्वेदी : तैत्तिरीय, कठ, चरक, मैत्रायणी वाराहसूत्र.

४- सामवेद.

यावरून फक्त वर दिलेल्या वेदशाखा आणि सूत्र यांना अनुसरणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती महाराष्ट्रांत होती असें समजूं नये. इतरहि शाखा अस्तित्वांत असतील. कारण, ज्या ज्या शास्त्रीय ब्राह्मणांना अग्रहार अथवा दानें मिळालीं त्यांचींच नांवें दानलेखांत आलीं आहेत. उदाहरणार्थ, अथर्वणवेदी ब्राह्मणांचा उल्लेख यादवांच्या लेखांत आढळत नाहीं. तथापि, ते असावेत. कारण, यादवांच्यापूर्वी चौथ्या शतकांत वाकाटकांच्या कालांत दुसऱ्या विंध्यशक्तीच्या वाशिमताम्रपटांत अथर्वणिकचरण-अथर्ववेदी-भालंदायण गोत्री जिऊज्ज जीवार्य-कपिंजलगोत्री रूद्रज्ज रुद्रार्य इत्यादि नांवें आलीं आहेत. या अथर्ववेदी ब्राह्मणांची वस्ती नान्देडजवळ होती. आज त्या भागांत एकहि अथर्ववेदी आढळत नाहीं. तथापि सातारा जिल्ह्यांत आजहि त्या ब्राह्मणांची वस्ती आहे. यावरून त्या कालांत महाराष्ट्रांत अथर्ववेदी ब्राह्मण असले पाहिजेत. इतर शाखा अस्तित्वांत असतील असें जें वर म्हटलें आहे त्याचें आणखीहि एक कारण असें आहे कीं, यादवांच्या आणि शिलाहारांच्या दानपत्रांमध्यें दान घेणाऱ्यांच्या नांवाबरोबरच गोत्रांचे उल्लेख हमखास आढळतात. त्यामानानें शाखासूत्रांचें उल्लेख कमी मिळतात. हा प्रकार चालुक्य आणि राष्ट्रकूट राजांच्या दानशासनांतहि दिसून येतो. उदाहरणार्थ, शिलाहार आणि यादव यांचे आतांपर्यन्त सुमारें १०५ कोरीव लेख महाराष्ट्रांत उपलब्ध झालें आहेत. त्यांपैकी २९ लेख ब्राह्मणांना दानें देण्यांसाठीं कोरण्यांत आले आहेत. त्यांपैकीं फक्त आठ लेखांत शाखांचें उल्लेख आढळतात. गोत्राचें मात्र सर्व लेखांत आहेत. त्यामुळें या कालांत गोत्राइतकें शाखांना महत्त्व नव्हतें कीं काय असें वाटतें. शके ११२८ च्या चांगदेवाच्या शिलालेखाचें उदाहरण या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हा चंगदेव अथवा चांगदेव सुप्रसिद्ध ज्योतिषी व गणिती भास्कराचार्य याचा नातु होता. प्रस्तुत लेखांत त्यानें आपली वंशावळ दिली आहे. परंतु ती देतांना आपल्या शाखेचा उल्लेख न करतां 'शाण्डिल्यवंशे कविचक्रवर्तीत्रिविक्रमोभूत्, असा फक्त गोत्राचा त्यानें उल्लेख केला आहे. वस्तुतः चांगदेवासारख्या विद्वान् ब्राह्मणानें आपल्या शाखासूत्राचा उल्लेख करणें आवश्यक होतें. परंतु, तसें त्यानें केलें नाहीं. असाच प्रकार विज्ञानेश्वर आणि हेमाद्रि या प्रसिद्ध शास्त्रकारांच्या बाबतींत झाला आहे. त्यांनीं आपल्या ग्रंथांत स्वत:संबंधीं माहिती देतांना स्वगोत्रांचा निर्देश केला आहे. शाखांचा नाहीं. हेमाद्रीचे चरित्रकार श्री. पाध्ये यांनीं हेमाद्रि हा शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेचा होता असें म्हटलें आहे. परंतु या विधानास त्यांनीं आधार मात्र दिला नाहीं. त्यांवरून असें दिसून येतें कीं, आज आपण आडनांवांना ज्या प्रमाणें महत्त्व देतो त्याच-










प्रमाणें मध्ययुगीन समाजांत गोत्रांना महत्त्व होतें. त्यामुळें शिलाहार यादवांच्या दानपत्रांतून आडनांवांचे उल्लेख अपवादानेंच आढळतात. चांगदेवानें आपल्या कुलाची माहिती देतांना शाण्डिल्यवंशे हा जो शब्द प्रयोग केला आहे त्यास या दृष्टीनें बरेंच महत्त्व आहे. प्राचीनकाळीं गोत्र हा शब्द वंशवाचक असे. भिन्न-शाखांत एकच गोत्र आज ज्याप्रमाणें आढळतें त्या-प्रमाणें तें त्याकाळींहि असे. कारणपरत्वें बदल शाखेंत होई, परंतु गोत्रांत मात्र नसे. चित्तपावन कोंकणस्थ ब्राह्मण हे मूळ तैत्तिरीय शाखेचे असावेत, परंतु कांहीं कारणांमुळें ते ऋग्वेदी बनले असावेत असें एक मत आहे. तसेंच कुडाळदेशकर आद्य गौड ब्राह्मण मूळचे शुक्लयजुर्वेदी परंतु महाराष्ट्रांत स्थायी झाल्यावर कऱ्हाडयांच्या सहवासानें ऋग्वेदी बनले असें श्री. दिवेकर यांनीं सांगितलें आहे. यावरून शाखेंत बदल होत असे असें स्पष्ट दिसतें. तेव्हां प्राचीन लेखांतून ब्राह्मणांच्या नांवांपुढें गोत्रांच्या मानानें शाखांचे उल्लेख कमी आढळतात हें या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या वेदशाखांच्या बाबतींत आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, यादवकालीं दान घेणाऱ्या ब्राह्मणांच्या नांवाबरोबरच अमुक शाखा-ध्यायी असा शब्दप्रयोग जास्त प्रमाणांत आढळतो. उदाहरणार्थ, दंतीदुर्ग राष्ट्रकूटाच्या सामनगड ताम्रपटांत करहाटकाचा रहिवासी नारायण भट्ट हा ऋग्वेदाचा अभ्यासक असून वेदवेदांगांत निपुण होता असा उल्लेख आला आहे. तसेच शके ७३० च्या वणी-नासिक-ताम्रपटांत वेंगीचा राहणारा तैत्तिरीय शाखेचा चतुर्वेदी दामोदर भट्ट आणि द्विवेदी दामोदराचा पुत्र चतुर्वेदी सभेचा, असे उल्लेख आढळतात. यांवरून दामोदर भट्ट याची मूळ शाखा तैत्तिरीय होती तरी पण चार वेदाचें अध्ययन म्हणून चतुर्वेदी अशी उपाधि त्याच्या नांवांच्या मागें लागली. द्विवेदी, त्रिवेदी आणि चतुर्वेदी हीं आडनांवें आज उत्तरहिंदुस्थानांतील गौडसारस्वत ब्राह्मणांत आढळतात. परंतु प्रस्तुत ताम्रपटांवरून प्राचीन महाराष्ट्रांत तीन तीन अथवा चार चार वेदांचें अध्ययन करणारे ब्राह्मण असत. इतकेंच नव्हे तर त्यांचे निरनिराळे समाज असत, असें द्विवेदी समाजाचा घटक, अथवा चतुर्वेदी समाजाचा घटक या उल्लेखांवरून अनुमान करावेंसें वाटतें. हे ब्राह्मण मूळ वेंगीचे म्हणजे आंध्रप्रांतांतील असल्यामुळें उत्तरेकडील द्विवेदी, चतुर्वेदी या आडनांवांच्या ब्राह्मणांशीं त्यांचा कांहींहि संबंध दिसत नाहीं.

### पोटजाती

वर गोत्र आणि शाखा यांचें जें विवेचन करण्यांत आलें आहे, त्यावरून एक प्रश्न आपल्या मनांत येतो तो असाः आजचा महाराष्ट्रीय ब्राह्मणसमाज ज्याप्रमाणें सुमारें चाळीस पोट-जातींनीं विभागला गेला आहे अथवा अनेक पोट-जातींचा बुजबुजाट हे जसें आजच्या समाजाचें वैशिष्ट्य आहे तसा प्रकार यादवकालीन समाजांत आढळून येतो काय ? याबाबतींत कोरीव लेख, धर्मशास्त्रांतील वचनें आणि समकालीन वाङ्मय यांतील उल्लेख लक्षांत घेतल्यास बहुधा नकारच मिळतो. आज पंचगौड आणि पंचद्राविड जमातींत रोटी-बेटी व्यवहार वर्ज्य आहेत. इतकेंच नव्हे तर, पंचद्राविडां-पैकींच ऋग्वेदी शाकलशाखीय आणि आश्वलायनसूत्रीय चित्तपावन कोंकणस्थ या पोट-जातीचा त्याच शाखा-सूत्रांतील पद्ये भट्टप्रभु आणि गोवर्धन या पोट जातींशीं रोटी-बेटी व्यवहार वर्ज्य आहेत. लग्नव्यवहार तर फार थोड्या पोटजाती वगळयास बहुतेक एका पोटजातीचा दुसऱ्या पोटजातीशीं होत नाहीं. उदाहरणार्थ, एकाच शाखासूत्रांतील ऋग्वेदी देशस्थ, चित्पावन आणि कऱ्हाडे या तीन पोटजातींत परस्पर लग्नव्यवहार वर्ज्य आहे. शिक्षणामुळें असो वा समाज-जागृतीमुळें अलीकडे हे व्यवहार थोडेफार सैल झाले आहेत हा प्रश्न निराळा.

या भिन्न पोट जाती आणि त्यांच्यांत आढळणारे रोटी–बेटी व्यवहाराचे निर्बन्ध यादवकालांत दिसून येत नाहींत. कारण, वर सांगितल्याप्रमाणें यादवांच्या दान-शासनांत अथवा मध्ययुगीन धर्मशास्त्रांत शाखा-सूत्रांचे उल्लेख मिळतात. पोटजातींचा निर्देश आढळत नाहीं. गोवर्धन, कऱ्हाटक आणि सहवासी या तीन प्रादेशिक ब्राह्मणांचें उल्लेख दानपत्रांत आढळतात. परंतु या प्रादेशिक भेदांना पोटजातीचें स्वरूप आलें नसावें. या बाबतींत हेमाद्रीचें पुढील वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

"आर्यावर्तेषु च समानदेशवासिनां नानाशाखाध्यायीनां अप्युपलभ्यन्ते एव परस्परअनवगीयमानाः सर्वतो विवाहसंबंधाः ... अतो न कन्यादाने नापि हविर्दाने स्वशाखीयद्विजनियम इति सिद्धम् ।"







यावरून भिन्नशाखीय ब्राह्मणांमध्यें बेटीव्यवहार करण्यास हरकत नाहीं असें हेमाद्रीनें स्पष्ट सांगितलें आहे. हेमाद्रीच्या या वचनाला गृह्यसूत्रादि प्राचीन ग्रंथांचा आधार आहे. आतां, हेमाद्रीचे ग्रंथ महाराष्ट्रांतच नव्हे तर तेलंगण आणि कर्नाटक या प्रांतांतहि धर्मशास्त्राच्या बाबतींत प्रमाण मानीत असत ही गोष्ट अन्नेमाच्या वनपाली ताम्रपटांत शके १३०० आणि माधवाचार्यांच्या कालनिर्णयांत सांगितली आहे. तेव्हां यादवकालांत भिन्न भिन्न शाखांमध्यें बेटीव्यवहारांना बंदी नव्हती हें उघड आहे.

यादवकालांत अनेक वेदशाखा होत्या आणि त्या त्या शाखेला अनुसरणारे ब्राह्मण होते हें वर सांगितलें आहे. परंतु ह्या शाखांना पोटजातींचें स्वरूप आलें नव्हतें असेंहि वर सांगितलें आहे. कारण, पोटजातींचें मुख्य गमक म्हणजे रोटी अथवा बेटी व्यवहार यांचें निर्बंध हें होय. यादवकालांत हे निर्बन्ध अस्तित्वांत नसल्यानें पोटजातींचा उदय झाला नव्हता असेंच म्हणणें प्राप्त आहे.

आजच्या समाजांत ज्या भिन्न पोटजाती आढळून येतात, त्या अनेक कारणांमुळें निर्माण झाल्या. त्यांपैकीं प्रदेशभेद, व्यवसायभेद, आचारभेद, उपासनाभेद आणि वेदशाखाभेद हीं मुख्य होत असें कांहीं संशोधकांचें मत आहे. याशिवाय, ग्रामण्य, मत्सर यासारख्या क्षुद्र कारणांचीहि त्यांत भर पडली आहे. त्यामुळें एकाच वेदशाखेंत अनेक पोटजाती निर्माण झालेल्या आढळून येतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतील शाकल शाखा आणि आश्वलायन सूत्रांत बारा पोटजाती आहेत. तोंच प्रकार शुक्लयजुर्वेदाच्या बाबतींतहि दिसून येतो. ऋग्वेदांतील या बारा पोटजातींपैकीं कऱ्हाडे, चित्पावन, देवरुखे, गोवर्धन आणि सहवासी या पोटजाती प्रदेशमूलक आहेत. स्मार्त आणि वैष्णव हे भेद उपासनामूलक आहेत. आणि भट्टप्रभु, क्रमवन्त, गोवर्धन आणि पत्रे, हे मत्सर आणि ग्रामण्यमूलक आहेत.

## पोटजातीच्या उद्भवाची पार्श्वभूमि

हे आचार व उपासनादि भेद अथवा ग्रामण्य यांपासून यादवकालीन समाज अलिप्त होता. परंतु, हा एकोपा पुढें फार दिवस टिकला असें दिसत नाहीं. कारण, रामदेव यादवाच्या अमदानींत अल्लाउद्दीन खिलजीची देवगिरीवर स्वारी झाली. त्यानंतर लवकरच यादवांच्या सत्तेचा अन्त होऊन महाराष्ट्रावर मुसलमानांचा अंमल सुरूं झाला. या राज्यक्रांतीच्या जोडीला दुर्गादेवीच्या दुष्काळासारख्या भयंकर आपत्तीस महाराष्ट्रास तोंड द्यावें लागलें. महाराष्ट्रसारस्वतांत या भीषण परिस्थितीचें दारुण चित्र पहावयास सांपडतें. या दुष्काळांत लक्षावधि लोक प्राणांस मुकले असतील व बरेंच लोक देहरक्षणासाठीं परप्रांतांत गेले असतील असें अनुमान त्यांवरून काढतां येतें. त्यामुळें या कालांत बरीच मोठी समाजक्रांति झाली असावी असें वाटतें. आजच्या ब्राह्मणजातींत आचार, उपासना, प्रदेश यांसारखे जे भेद दिसतात ते याच समाजक्रांतीमुळें निर्माण झाले असावेत. उदाहरणार्थ, मातुलकन्यापरिणयाची चाल उत्तरेकडे नाहीं. बौधायनाखेरीज इतर सर्व धर्मशास्त्रकारांनीं तिचा निषेध केला आहे. ही चाल कर्नाटक आणि तेलंगण प्रांतांत आहे. तेव्हां दुष्काळानंतर शेजारच्या प्रांतांतले लोक महाराष्ट्रांत स्थानिक झाले असतील आणि त्यांच्या संपर्कानें ही चाल ऋग्वेदी देशस्थ आणि कृष्णयजुर्वेदी व इतर कांहीं शाखांत शिरली असावी. कारण, अपरार्क आणि हेमाद्रि यांसारख्या महाराष्ट्रीय धर्मशास्त्रकारांनीं या चालीचा निषेध केला आहे. त्यामुळें शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन आणि चित्पावन कोंकणस्थ या दोन पोटजातींनीं या चालीचा स्वीकार केला नाहीं. याचा परिणाम म्हणून बेटीव्यवहार निर्बन्धासारखे प्रकार सुरूं झाले. दुष्काळानंतर शेजारच्या प्रान्तांतील जे ब्राह्मण समाज महाराष्ट्रांत स्थायिक झाले त्यांनीं आपल्या बरोबर त्या त्या प्रांतांतील चालीरीति आणल्या. त्यामुळें येथील ब्राह्मणसमाज विघटित होऊन पोटजातींची वाढ झाली. उदाहरणार्थ, त्रिगुळ आणि अमीर या पोटजाती, चालीरीति आणि ग्रामण्यामुळें अस्तित्वांत आल्या असाव्यात. वस्तुतः तिरगुळ हे मूळचे कृष्णयजुर्वेदी तैत्तिरीय शाखेचे सप्तगोदाकांठचे तेलंगी ब्राह्मण. कांहीं दैवी आपत्तीमुळें उदरभरणासाठीं महाराष्ट्रांत आले. आणि पानमळ्यांवर उपजीविका करूं लागले. तेव्हां इतर शाखीयांनीं मत्सरानें हें तिरगुळ पानांवरील किडे मारतात असा पुकारा करून यांच्याशीं अन्नव्यवहार वर्ज्य केला. वस्तुतः कृष्णयजुर्वेदी तैत्तिरीय शाखेचे ब्राह्मण महाराष्ट्रांत फार पुरातन काळापासून म्हणजे सातवाहनापासून स्थायिक झालेले आढळून येतात. परंतु नवागत-












तैत्तिरीय किंवा तिरगुळ यांच्यामुळें एकाच शाखेत दोन पोटजाती निर्माण झाल्या. अशाच प्रकारें मत्सरामुळें गोवर्धन म्हणजे गोळख, भट्ट-प्रभु, क्रमवन्त, पद्ये, अमीर इत्यादि पोटजाती निर्माण होऊन ब्राह्मण समाजांत तट पडले. अशा रीतीनें प्रदेशमूलक, आहारमूलक आचारमूलक अथवा ग्रामण्यमूलक अशा भिन्न भिन्न कारणांमुळें पोटजाती अस्तित्वांत आल्या. यादवकालीं यांपैकीं वरींच कारणें अस्तित्वांत नसल्यानें या पोटजातींचा इतिहास फार जुना नाहीं. या पोटजाती आपली परंपरा प्राचीन आहे असें सांगत असतात. परंतु वेदशाखांवर आधारलेल्या व अतिप्राचीन गणलेल्या पोटजातींना देखील प्राचीन इतिहास नाहीं. वेदशाखांत भेद पूर्वी होते हें खरें असलें तरी या भेदांना स्वतंत्र पोटजातींचें स्वरूप इतर पोटजातींप्रमाणेंच यादवोत्तर कालांत आलें. चित्तपावन, कऱ्हाडे या पोटजातींचें स्वरूप यांहून निराळेंच आहे. वेदशाखांच्या दृष्टीनें पाहिल्यास देशस्थ, ऋग्वेदी आणि या जाती यांच्यामध्यें कांहींच अन्तर नाहीं. परंतु, प्रदेश, आचार अथवा उपासना यांच्या भेदांमुळें या पोटजातींना वेगळेपणा आला. या वेगळेपणाबाबत ज्या पौराणिक दंतकथा आहेत त्या निंदाव्यंजक असल्यानें सदोष वाटतात. ज्या ग्रंथांत या कथा आल्या आहेत त्यांच्या कालासंबंधानेंहि निश्चयात्मक विधान करतां येत नाहीं. उदाहरणार्थ, स्कंधपुराणांतील एका कथेंत परशुरामानें चौदा प्रेतांना जिवंत करून त्यांना ब्राह्मणधर्म शिकविला आणि प्रायश्चितासाठीं लागणाऱ्या ब्राह्मणांची नड भागविली. या चौदा गोत्री ब्राह्मणांपासून चित्तपावन जातीचा उदय झाला असें म्हटलें आहे. अशारीतीनें चितेपासून पावन झाले ते चित्तपावन अशी चित्तपावनांची उत्पत्ति सांगण्यांत येते. ही कथा उघड उघड निंदाव्यंजक आहे. अशा प्रकारच्या कथांना कितपत प्रमाण मानावें हा प्रश्नच आहे. अशाच प्रकारची कथा अभिरासंबंधींहि आली आहे.

या प्रकारच्या विपर्यस्त समजुती रूढ करण्यांत वरील सारख्या पौराणिक ग्रंथांनी जसा हातभार लावला त्याचप्रमाणें वृत्तीसाठीं भांडणाऱ्या भिक्षुकांनींहि त्यांत भाग घेतलेला आहे. हा प्रकार यादवकालांत आढळत नाहीं. त्याचें कारणहि उघडच आहे. ज्या राजांनीं ब्राह्मणांना वर्षासनें किंवा अग्रहारादि इनाम जमिनी देऊन त्यांचा योगक्षेम चालविला. ज्यांनीं आपल्या दान-शासनांत त्यांच्या संबंधीं आदराचे उद्गार काढले त्यांच्या अमदानींत अशा प्रकारच्या विपर्यस्त समजुतींना अथवा उच्च-नीच कल्पनांना थारा मिळणें शक्य तरी आहे काय ? हेमाद्रि-बोपदेवांसारखे पंडित ब्राह्मणांसंबंधानें विपर्यस्त उद्गार काढीत नाहींत हें स्वाभाविकच आहे. परंतु, चक्रधरासारखे महानुभावपंथप्रवर्तक आणि ब्राह्मणांचे पक्षपाती नसलेले महंत ब्राह्मणांसंबंधानें अनुदार उद्गार काढीत नाहींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## महानुभाव ग्रंथांतील विवेचन

आतांपर्यन्त झालेल्या यादवकालीन महानुभाव ग्रंथावरून फक्त कऱ्हाडे आणि कण्व या दोनच पोटजातींचा उल्लेख आढळतो. परंतु, त्या निराळ्या पोटजाती होत्या असें दिसत नाहीं. कऱ्हाडे ब्राह्मणांचीं नांवें इ. स. च्या सातव्या शतकापासूनच्या दान पत्रांत आढळतात. शके ५२० च्या पाली ताम्रपटांत सातारा जिल्ह्यांत कऱ्हाटक विषयांत भारद्वाजगोत्री वासुदेवभट्ट या ब्राह्मणांस एक गांव अग्रहार दिल्याचा उल्लेख आहे. तसेंच राष्ट्रकूट दन्तिदुर्गाच्या सन ७५३ च्या सामनगड ताम्रपटांत नारायणभट्ट नांवाच्या ब्राह्मणाचा करहाटकचा रहिवाशी – करहाटकवासिनः – असा उल्लेख आला आहे. हा ब्राह्मण ऋग्वेदाचा अभ्यासक असून वेदवेदांगांत निपुण होता असेंहि या लेखांत म्हटलें आहे. कऱ्हाडचे ब्राह्मण सातव्या शतकापासून प्रदेशभेदानें प्रसिद्ध होते असें अनुमान यावरून निघतें. करहाटक भागांतील ब्राह्मणांना दानशासनांतून कऱ्हाटकचे रहिवाशी अर्थात् प्रदेशवाचक म्हणून प्रसिद्धी मिळाली. त्यामुळें महानुभावपंथ संस्थापक चक्रधरस्वामींनीं आपले आजेगुरु चक्रपाणि राऊळ यांची चरित्रविषयक माहिती देतांना 'फलेठाणीं कऱ्हाड्या ब्राह्मणांचां घरीं अवतारु स्वीकारिला' असें सांगितलें आहे. वस्तुतः चक्रधरांनीं आपले गुरू गुण्डम राऊळ यांची चरित्रात्मक माहिती 'देतांना कण्व ब्राह्मणांचां घरीं अवतारू स्वीकारिला' असें ज्या प्रमाणें सांगितलें आहे त्याचप्रमाणें कऱ्हाडे ब्राह्मणांचे घरीं याचे ऐवजीं त्यांना ऋग्वेदी ब्राह्मणाचे घरीं असें सांगतां आलें असतें. परंतु, पूर्वीपासूनच कऱ्हाडे ब्राह्मण आपल्या प्रदेशवाचक नांवानें प्रसिद्ध होते म्हणून त्यांच नांवाचा त्यांनीं उल्लेख केला आहे.










वस्तुतः चक्रधरस्वामी अथवा त्यांचे नागदेवाचार्यांसारखे शिष्य यांचें भ्रमण सबंध महाराष्ट्रभर होतें. वर रामटेकपासून खालीं नान्देडपर्यन्त त्यांनीं प्रवास करून आपल्या पंथ-प्रचाराचें कार्य केलें. शेंकडों लोकांच्या भेटी-गांठीं घेतल्या, त्यांत ब्राह्मणच जास्त होते. असें असतांना प्रदेश, आचार, उपासना, व्यवसाय आणि ग्रामण्य यांमुळें सुमारें चाळीस पोटजातींचा बुजबुजाट जो आज दृष्टीस पडतो, त्यांपैकीं थोड्यांचे तरी उल्लेख लीळाचरित्रादि यादवसमकालीन महानुभाव ग्रंथांत सांपडावयास हवे होते. परंतु तसा कांहीं प्रकार दिसत नाहीं. फक्त कऱ्हाडे ब्राह्मणांचाच प्रदेशमूलक भेद उल्लेखिलेला आढळतो. ज्ञानेश्वरादि संतांच्या वाङ्मयांतहि पोटजातींचे उल्लेख आढळत नाहींत. त्याचें कारण अर्थात् उघड असेंच आहे. तें म्हणजे यादवांच्या कालांत पोटजाती अस्तित्वांतच नव्हत्या.

कऱ्हाडे ब्राह्मणांचा जो उल्लेख आढळतो तो पोटजातींचा वाचक नसून प्रदेशवाचक आहे असें म. म. काणे यांचेंहि मत आहे. ते म्हणतात, प्राचीन दानपत्रांत जेव्हां जेव्हां दान घेणाऱ्या ब्राह्मणाचे करहाटविषय वास्तव्य म्हणून उल्लेख येतात त्यावेळीं तो उल्लेख पोटजातीचा सूचक आहे असें मानूं नये. कारण करहाटक ब्राह्मणांप्रमाणेंच करहाटक निगम-व्यापारी संघ आणि करहाटक पाषण्ड तसेंच आयमुवनकर-लोखंडाचे व्यापारी यांचेहि उल्लेख भरहुतस्तूपासारख्या प्राचीन लेखांत आढळतात. म. म. काणे यांचे वरील मत कऱ्हाडे पोटजातीच्या दृष्टीनें सयुक्तिक वाटतें. तथापि, या बाबतींत एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही कीं, कांहीं प्राचीन लेखांत करहाटक ब्राह्मणहि ऋग्वेदी होते असें म्हटलें आहे. आजहि कऱ्हाडे हे सगळे ऋग्वेदी शाकल शाखेचे आहेत. तेव्हां हल्लींच्या कऱ्हाडे ब्राह्मणांचे ते पूर्वज होते कीं काय ? कदाचित् या भागांतील ब्राह्मण राजाश्रय मिळाल्यानंतर आपली मूळ भूमि सोडून अग्रहार अथवा इनाम गांवीं गेल्यावर आपल्या मूळ प्रदेशाचें म्हणजे करहाट विषयाचें नांव आपल्या नांवाबरोबर लावीत असावेत. आजहि पुष्कळ ब्राह्मण कुटुंबाचीं गांवावरून जीं आडनांवें पडलीं आहेत उदाहरणार्थ, नासिककर, पुणतांबेकर, पैठणकर, अमळनेरकर; तींहि करहाटक प्रमाणेंच मूळ भूमीचीं निदर्शक आहेत. या आडनांवांना पुढें जसें कायम स्वरूप येतें आणि पिढयान्‌पिढया तीं कुटुंबें त्यांच नांवांनीं ओळखलीं जातात तसाच प्रकार कऱ्हाड्यांच्या बाबतींत झाला असावा. शिवाय करहाट हा प्रान्त फार प्राचीन कालापासून प्रसिद्ध होता असें दिसतें. महाभारतांतहि त्याचा उल्लेख आला आहे. तेव्हां अशा प्रसिद्ध प्रान्तांतील ब्राह्मण कोंकण, पुणें, अहमदनगर, कोल्हापुर इत्यादि भागांत राजाश्रयाच्या निमित्तानें स्थायिक झाल्यावर आपल्या मायभूमीस न विसरतां तिचें नांव आडनांवाप्रमाणें आपल्या नांवाच्या मागें लावीत असत. यांतूनच पुढें कऱ्हाड्यांची पोटजात उदयास आली असावी. कै. वि. का. राजवाडे यांनीं शके १२०० नंतर दक्षिण कोंकणांत शिलाहारांच्या राजवटींत कऱ्हाडे उदयास आले असें म्हटलें आहे. वरील इतिहास लक्षांत घेतां आणि चालुक्य, राष्ट्रकूट कालांतील करहाटक ब्राह्मणांचे अनेक उल्लेख ध्यानांत घेतल्यानंतर राजवाडे यांचे मत टिकत नाहीं.

करहाटक ब्राह्मणांप्रमाणेंच गोवर्धन आणि सहवासी या दोन प्रादेशिक ब्राह्मणांचे उल्लेख प्राचीन शिलालेखांत आढळतात; परंतु, कऱ्हाड्यांना राजाश्रय मिळाल्यानें त्यांचे उल्लेख दानपत्रांत जेवढे आढळतात. तेवढे सहवासी किंवा गोवर्धन यांचे आढळत नाहींत. सातवाहनांच्या शिलालेखांत प्रथम गोवर्धन ब्राह्मणांचा उल्लेख आढळतो. नाशिकच्या सभोंवतालच्या प्रदेशास गोवर्धन असें नांव होतें असें या निर्देशावरून वाटतें. या प्रदेश-नांवावरून गोवर्धन असें त्या प्रान्तांतील ब्राह्मणाचें नांव पडलें. शहरांत नृपति नहपान याचा जांवई उषवदात यानें एक लक्ष ब्राह्मणांना भोजन दिलें असें नाशीक येथील मिरदमी शिलालेखांत म्हटलें आहे. यावरून नाशीक जिल्ह्यांत या ब्राह्मणांची बरीच मोठी वसाहत होती असें दिसतें. सातवाहनानन्तर या ब्राह्मणांना राजाश्रय न मिळाल्यानें तें मागें पडलें असावेत. कारण, त्यानंतर शके ५२० च्या एका बोरगांव ताम्रपटांत फक्त एका काश्यपगोत्री गोवर्धन ब्राह्मणाचा उल्लेख आढळतो. त्यापुढें एकदांहि गोवर्धनाचा उल्लेख दानशासनांत मिळत नाहीं. तथापि, त्यांची वस्ती महाराष्ट्रांत होती. कारण, यादवांच्या पडत्या कालांत बिंबयादवाचें-रामदेवाच्या मुलाचें उत्तर कोंकणांत राज्य असतां








चांगुणाबाई नांवाच्या गोवर्धन शाखीय सर्वाधिकारी वृत्त्यंशी स्त्रीचा उल्लेख कागदपत्रांत आढळतो. या बाईपासून यादवांचे राजपुरोहित पुरुषोत्तमपंत कावळे यांना बिंब राजानें एक लक्ष रुपये देऊन वृत्ति मिळवून दिली. यानंतर मात्र गोवर्धनांचे वृत्तीसाठीं इतर शाखीयांबरोबर तंटेबखेडे सुरू झाले. त्यामुळें ग्रामण्यें उद्भवलीं. आणि गोवर्धनांना गोळख हें निंदाव्यंजक नांव मिळालें. वस्तुतः त्यांत गोवर्धनाचा थोडा सुद्धां दोष नाहीं; इतर ब्राह्मणांची आगळीक आहे.

सहवासी ब्राह्मणांना गोवर्धनांप्रमाणें ग्रामण्याची झळ लागलेली दिसत नाहीं. या ब्राह्मणांचा उल्लेख वीरभोजदेव शिलाहाराच्या शके १११२ च्या कोल्हापुर येथील दानपत्रांत आढळतो. यांत दान घेणाऱ्या ब्राह्मणांपैकीं सहवासी आदित्यभट हा एक ब्राह्मण आहे. बाकीचे धैसास आडनांवाचे दोन ब्राह्मण आहेत. याशिवाय, शके १०७० च्या शिलाहार हरपालदेव याच्या रांजाली लेखांत सहवासी ब्राह्मण विष्णु उपाध्याय याचें नांव मिळतें. यावरून कोल्हापुर भागांप्रमाणेंच कोंकणांत सोपाऱ्याजवळ अकराव्या शतकांत सहवासी ब्राह्मणांची वस्ती होती असें म्हणावयास हरकत नाहीं. श्री. महादेवशास्त्री दिवेकर यांनीं आपल्या पुस्तकांत देशस्थ सहवासी ब्राह्मण हे मूळचे कर्नाटकांतले, टिपु-सुलतानाच्या वेळीं महाराष्ट्रांत आले; असें सांगितलें आहे. परंतु वरील दानपत्रांतील उल्लेखांवरून त्यांचें मत वस्तुस्थितिनिदर्शक आहे असें वाटत नाहीं.

आतांपर्यन्त ब्राह्मणांतील शाखाभेद आणि त्यांच्या गोत्रांचें महत्त्व, अग्रहारादि दानांमुळें त्यांचें होणारें स्थलान्तर, त्यामुळें प्रदेशभेदाला मिळालेलें स्थान, तथापि, समकालीन राजांचे आश्रय आणि हेमाद्रि व अपरार्क यांसारख्या धर्मशास्त्रकारांच्या वचनामुळें निरनिराळ्या शाखांत होणारें लग्न आणि अन्नव्यवहार यांच विवेचन वर करण्यांत आलें आहे. चित्तपावन आणि कुडाळदेशकर तसेच पंचगौड आणि पंचद्रावीड यांच्या परस्परसंबंधाचा इतिहासहि बराच उद्बोधक असा आहे. तो विषय पुढील लेखांसाठीं राखलेला बरा.

---

## इंग्रजी विद्या समजून घ्यावी

“ आमचें नशीब अनुकूल होईल, तेव्हां आम्हास विद्या लागणार नाहीं, जें चिंतू तें मिळेल, ही समजूत विसरावी. असें मागें कधीं झालें नाहीं, व पुढेंही होणार नाहीं. पुराणातल्या गोष्टी पुराणांत ठेवाव्या. भलतेच अर्थ मूर्ख पुराणिक असतात ते करितात, व भलतीच समजूत पाडितात.

याजकरिता सांप्रत इंग्रजींत ज्या ज्या विद्या, भूगोल, खगोल, राजनीति इत्यादि आहेत त्यांचा विचार करावा व त्यांतील समजुती करून घ्याव्यात म्हणजे तुम्हास फार संतोष होईल. असें केल्याशिवाय लोकांस कोणतेंही कार्य नीट करतां येणार नाहीं. सरकारनें लोकांस मोठीं कामें दिलीं तर ते अनर्थ व जुलूम करतील, लांच खातील, डौल करतील व लोकांचें कल्याणार्थ झटावयाचें नाहींत. यांचे प्रत्यंतर सांप्रत जे लोक रोजगारावर आहेत त्याजकडे पाहिलें म्हणजे मिळेल.

लोकहितवादी - शतपत्रें.

## सद्गुणांची सार्वत्रिकता

सद्गुण सार्वत्रिक झाले पाहिजेत अशी आमची इच्छा आहे. अपरिग्रहरूपी रत्नाचा प्रत्येकाला लाभ मिळाला पाहिजे. आजच्या गृहस्थांत अपरिग्रह मुळींच नाहीं. त्यांना सदैव चिंताच चिंता. निश्चित जीवन नाहीं. ज्या यतींना निश्चित जीवन प्राप्त होतें तेंहि इतरांच्या परिग्रहावर. आमच्या राज्यांत कोणी परिग्रह करणार नाहीं आणि कोणी भिक्षाहि मागणार नाहीं. प्रत्येक परिश्रम करील. ही अपरिग्रहाची शक्ति आम्ही प्रकट करूं इच्छितों.

— विनोबा







प्रा. रा. ना. गद्रे

# कै. प्रा. शि. म. परांजपे -- वाङ्मय आणि कर्तृत्व

मनोवाग्लेखकृतिभी राष्ट्रमोक्षनिरूपकः । परांजपेकुलोत्पन्नः शिवरामोऽभिवाद्यते ।।

" काळांत बहुतकरून राजकीय विषयावरच विशेष चर्चा येत असते. ह्या राजकीय विषयासंबंधानें आपल्या हल्लींच्या देशस्थितीकडे लक्ष देऊन पाहिलें असतां कोणालाहि असें आढळून येईल कीं, आपल्या सगळया राजकीय विषयांमध्यें राजनिष्ठा आणि स्वदेशभक्ति हीं दोन मुख्य अंगें आहेत...सत्याची किंमत फार मोठी आहे आणि सत्यावर कितीहि संकटें आलीं तरी अखेरीस सत्याचाच विजय व्हावयाचा, ही गोष्ट ठरलेली असल्यामुळें राजनिष्ठापूर्वक आणि देशभक्तिपूर्वक सत्यस्थिति निदर्शनाचा मार्ग आम्ही स्वीकारिलेला आहे; व आमच्या लेखांमधून ह्याच तीन गोष्टींना नेहमी प्राधान्य दिलेलें असतें. " --- का. नि. भाग ७ वा, हृदयाविष्करण.

" सारांश, आपल्यापाशीं चांगलीं हत्यारें नव्हतीं, किंवा आपण कवायती कंपू तयार करून लढूं लागलों, म्हणून आपले हे पराजय झाले, ही कारणमीमांसा बिलकुल चुकीची आहे. हे आपले पराभव आपल्या नैतिक अधःपातानें घडवून आणलेले आहेत. आपला धर्म, आपला देश, आपलें स्वातंत्र्य, आपलें राज्य, आपलें ऐक्य, आपलें बंधुत्व या गोष्टीं ज्यांना प्राणापेक्षांहि प्रिय होतात, त्या लोकांनाच लढायांतून विजय मिळतात, त्यांचींच राज्यें प्रस्थापित होतात आणि त्यांचींच स्वातंत्र्यें कायम टिकतात. "

— मराठ्यांच्या लढायांचा इतिहास, प्रस्तावना, पा. १३

" चांगल्या ग्रंथरचनेला शिक्षण हें सर्व प्रकारांनी चांगलेंच असलें पाहिजे. पण त्यांतल्या त्यांत व्याकरण, न्याय आणि अलंकार या शास्त्रांची जोड असणें विशेषच जरूर आहे. व्याकरणशास्त्रानें शब्द सुंदर होतील; न्यायशास्त्रानें विचार सुंदर होतील; आणि अलंकारशास्त्रानें ते विचार सुंदर रीतीनें मांडतां येतील. "

— साहित्यसंग्रह, भाग ३ रा, पा. ३२

"धर्म ही संस्था गुलामगिरीसाठीं नाहीं. मोक्ष हें धर्माचें अंतिम फळ होय. आणि मोक्ष म्हणजे स्वतंत्रताच. "

-- धर्मकल्पनांचा परिणाम.

शिवरामपंत परांजपे निवर्तल्याला सुमारें अठ्ठावीस वर्षें झालीं. या काळांत भारतांत अनेक महत्त्वपूर्ण घडामोडी झाल्या. स्वातंत्र्यप्राप्तीलाहि दहा वर्षें झालीं. परांजप्यांच्या हयातींत आणि नंतरच्या काळांत समकालीनांत उत्पन्न झालेलीं मतमतांतरें आतां कांहीं प्रमाणांत इतिहासजमा झाल्यासारखीं आहेत. सध्यां चाळिशींत असलेल्या पिढीला—विशेषतः पुण्याबाहेरच्या—परांजप्यांना प्रत्यक्ष पाहण्याची संधि मिळाली असण्याचा संभव नाहीं. त्यामुळें काळाच्या दूरतेमुळें त्यांच्या वाङ्मयाचा आणि त्यांच्यावरील टीकेचा निर्मळ मनानें अभ्यास करणें संभवनीय आहे. तशा अभ्यासानें त्यांच्या वाङ्मयाविषयीं आणि कर्तृत्वाविषयीं कांहीं निष्कर्ष बहुतांशीं निःपक्षपातीपणानें निष्पन्न होतील.

## संस्कारांचें लेणें

संस्कारांचें स्वरूप आनुवंशिक आणि शैक्षणिक असें दुहेरी असतें. शिवरामपंतांना आजोबा आणि वडील यांच्याकडून चित्र, मूर्ति आणि संगीत या कलांची देणगी जन्मतः लाभली. मानवी जीवन समृद्ध आणि सर्वांगीण करण्यासाठीं विद्वत्तेच्या जोडीला कलांच्या अभ्यासानें निर्माण होणारी रसिकता लागते. मातेकडून श्रद्धा त्यांना मिळाली. महानुभावित्व आणि शारीरिक देखणेपणा हींहि त्यांच्या बाबतींत आनुवंशिक होतीं. " कांहीं गुण सोन्याचा आणि कांहीं सोनाराचा " या म्हणीप्रमाणें जन्मजात गुणसंपदेच्या जोडीला शिक्षणाचे उत्तम संस्कार करणारे गुरु लाभण्याचें भाग्य परांजप्यांच्या वाट्याला आलें. विष्णुशास्त्री चिपळूण-








कर, वा. शि. आपटे, गोपाळराव आगरकर, बळवंत-राव टिळक, यांच्यासारखे आपापल्या विषयांपुरतें शिकवून समाधान न मानणारे व्यापक दृष्टीचे आणि विशाल ध्येयाचे शिक्षक त्यांना मिळाले. यांच्या शिकवणीचा खोल, चिरंतन परिणाम परांजप्यांच्या संस्कार-क्षम मनावर झाला. संस्कृतच्या जोडीला इतिहास, तर्कशास्त्र, पाश्चात्त्य वाङ्मय यांचें विपुल वाचन जिज्ञासु वाचक या नात्यानें त्यांनीं केलें. संस्कृतांतील काव्यनाटकादि गद्यग्रंथ, मुख्य दर्शनें; यांच्या जोडीला पाश्चात्यांच्या नवीन अद्ययावत् सर्वांगीण ज्ञानाची जोड देऊन त्यांनी आपली बुद्धि ज्ञानविज्ञानपूत केली. विद्यापीठांच्या परीक्षांत संस्कृत विषयांत अग्रमान पटकाविला. पण एवढेंच करून त्यांचें समाधान झालें नाहीं. पांडित्याच्या पोटीं येणारा रुक्षपणा त्यांच्या ठिकाणीं औषधालाहि आढळत नाहीं. एम्. ए. पर्यंतचें शिक्षण संपविण्याला त्यांना लागलेल्या एका तपांत पुढील कार्याची अमाप तयारी त्यांनी केली. पाश्चात्त्य राष्ट्रांचें इतिहास, विज्ञान, धर्म, तर्क, पाश्चात्त्यपौरस्त्य वाङ्मय यांचा तौलनिक अभ्यास करण्यांत यापैकीं बराच काळ त्यांनी वेचिला. या सर्वांचा संकलित परिणाम म्हणजे स्वातंत्र्यप्रेम, पारतंत्र्याची चीड, या भावना विवेकाच्या अधिष्ठानावर त्यांच्या ठिकाणीं दृढमूल झाल्या. डॉ. भांडारकरांनी शिष्यप्रेमानें सरकारी कॉलेजांत प्राध्यापक होण्याचा दिलेला सल्ला त्यांना मानवला नाहीं. विष्णुशास्त्री, आगरकर, टिळक या पिढींतल्या पुरुषांचा त्याग परांजप्यांच्या मनांत पूर्ण भरला होता. अर्थात् १८९५ मध्यें परांजप्यांच्या सार्वजनिक जीवनाचा आरंभ म्हणजे योगायोग नसून देशहितबुद्धीनें, निष्ठापूर्वक, त्यागबुद्धीनें रोवलेली कार्यारंभीची मुहूर्तमेढ होय. प्रतिभा, पांडित्य यांच्या मुशींत त्यांची राष्ट्रनिष्ठा ओतलेली होती आणि या राष्ट्रनिष्ठेंतून त्यांचें भावनामय शुद्ध स्वातंत्र्यप्रेम निर्माण झालें होतें आणि या स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं वाणी, लेखणी झिजवून देहदंड सोसण्याची त्यांनी तयारी केली होती. पदवीधर म्हणून सार्वजनिक जीवनांत पदार्पण करणारे परांजपे प्रतिभा, पांडित्य, भावना, रसिकता, स्वातंत्र्यप्रेम आणि त्यागबुद्धि यांचें षड्विध दर्शन होतें असें म्हणण्यानें अतिशयोक्ति होणार नाहीं. परतंत्र देशांतील पांडित्य देशसेवेसाठीं राबविण्याचा चिपळूणकर, टिळक आगरकरांचा कित्ता परांजप्यांनी गिरविला.

## कर्तृत्वाचा आरंभ आणि ' काळ '

महाराष्ट्र कॉलेजांत दोन वर्षे केलेल्या अध्यापनामुळें त्यांच्या नांवामागें ' प्राध्यापक ' हीं अक्षरें कायमचीं लागलीं. देवळांतील प्रवचनांत त्यांना स्वतःला आणि श्रोत्यांनाहि परांजप्यांच्या अलौकिक वक्तृत्वाचा साक्षात्कार झाला. हीं देवळांतील प्रवचनें स्वातंत्र्यदेवतेचें उद्गान करणारीं होऊं लागलीं आणि त्यांतून भारतीय स्वातंत्र्याचा पुरस्कार आणि गुलामगिरीचा तिरस्कार व्यक्त होऊं लागला. याच सुमारास महाराष्ट्रांत दुष्काळ पडला, रँडचा खून झाला, लो. टिळकांनीं गणपति आणि शिवाजी उत्सव सुरू केले. दुष्काळ-निवारण समितीचे चिटणीस, उत्सवांतील वक्ते या नात्यानें काढलेल्या दौऱ्यांत उत्तम प्रचारक आणि स्वातंत्र्याचे भाट म्हणून परांजपे जनतेच्या डोळ्यांत भरले, तर सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत सलले. १८९७ मध्यें लो. टिळकांना शिक्षा झाल्यावर सर्वत्र शुकशुकाट आणि भीति यांनीं वातावरण कोंदलें होतें. अशा आणीबाणीच्या वेळीं, शुक्रवार २५ मार्च १८९८ या दिवशीं ' काळा'स आरंभ झाला. पहिल्याच अंकांतील अग्रलेखांत काळाचा व्यापक अर्थ स्पष्ट करून माझा ' काळ ' परकीय राजवटीचा काळ होईल अशी इर्ष्या सूचित केली आहे.

तसेंच ' सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ' या लेखारंभींच्या अवतरणांतील चवथ्या ओळीचें रहस्य पटतें. लो. टिळकांचा ' केसरी ' तर आपला ' काळ ' असा गुरूवर मात करण्याचा रसिक पंडिती अभिनिवेश नांवांत शोधणें अगदींच अनाठायीं ठरणार नाहीं ! ' केसरी'ची गर्जना करणार्‍यास तुरुंगांत टाकून बंद केल्यावर असे अनेक केसरी जन्मास घालणाऱ्या ' काळा 'स परांजप्यांनीं जन्म द्यावा यांत त्यांचा निर्भयपणा, धडाडी आणि समयज्ञता दिसून येते. त्या काळांत महाराष्ट्रीय आणि पुढें लवकरच अखिल भारतीय नेता होणाऱ्या नरकेसरीस तुरुंगांत टाकून ब्रिटिश राजवटीविरुद्ध असंतोष निर्माण करण्याचें काम थांबेल अशी कल्पना करणाऱ्या नोकरशाहीस ' काळां'तील ' काळ ' नांवाच्या पहिल्याच अग्रलेखानें धक्का दिला. " स्वातंत्र्यार्थ धडपडणाऱ्या गुलाम राष्ट्रांतील अनेक लेखकांनीं










आणि वक्त्यांनीं केलेल्या स्फूर्तिदायक वाक्पाटवाचे मनोवेधक इतिहास प्रसिद्ध आहेत. परंतु मराठी भाषेंत अवघ्या दहा वर्षांत शिवरामपंतांनी केलेल्या पद्धतीची कामगिरी अन्य कोणी तशा प्रकारें तडीस नेल्याचें उदाहरण मिळणें दुरापास्त आहे. " ( का. नि. नि. भाग १ ला, पोतदार, पा. ८ ) त्यांचें दुसरें साप्ताहिक ' स्वराज्य ' याची सुरुवातहि लोकमान्यांच्या मृत्यूनंतर गुरुवार, १२ ऑगस्ट १९२० या दिवशीं झाली होती ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे.

वर्तमानपत्राचा खप हें जर त्याच्या लोकप्रियतेचें गमक मानिलें तर शिवरामपंतांच्या ' काळा 'नें चांगलीच लोकप्रियता मिळविली होती हें निश्चित. 'काळा'-च्या अंकांच्या एकूण खपाचा आंकडा आठवड्यास बावीस हजारांपर्यंत गेला होता. ही गोष्ट पन्नास वर्षांपूर्वीची आहे, हें ध्यानीं धरल्यास विस्मय वाटल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच परांजप्यांच्या लेखणीची अद्भुत मोहिनी तत्कालीन वाचकांवर केवढी मोठी होती हेंहि पटेल. आजच्या सारखी पदरचा पैसा टाकून वर्तमानपत्र वाचण्याची गोडी त्या काळांत फारशी नव्हती ही गोष्ट लक्षांत ठेविल्यास परांजप्यांच्या असाधारण लेखनकामगिरीचें महत्त्व उलगडेल.

## स्वातंत्र्याचें उद्गान

लोकांच्या मनांत स्वातंत्र्याची स्पृहा आणि प्रीति निर्माण करणें हें परांजप्यांचें मुख्य उद्दिष्ट. पारतंत्र्याची चीड येण्यासाठीं ब्रिटिश राजवटीविरुद्ध असंतोष निर्माण करणें हें त्यांच्या मुख्य उद्दिष्टाचें उपांग होय. या मुख्य-गौण उद्दिष्टांच्या प्रतिपादनासाठीं त्यांनीं देशी परदेशी इतिहास; भारत, चीन, दक्षिण आफ्रिकादि देशांवरील पाश्चात्त्यांचीं आक्रमणें; दुष्काळ, उपासमार बेकारी यांचीं ब्रिटिश राजवटींतील चित्रणें; धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक सुधारणांचा पुरस्कार करून स्वकीयांचा अभिमान जागृत करणारी विचारसरणी आणि पौराणिक काल्पनिक कथा या साहित्याचा लेखांसाठीं सर्वत्र उपयोग केला आहे. शिवाय पर्वत, नद्या, डोंगरी किल्ले, निसर्गश्री इत्यादींचा, इतकेंच नव्हे तर पुस्तक-परीक्षणासारख्या गोष्टीचाहि त्यांनीं स्वातंत्र्याचें प्रतिपादन करण्यासाठीं उपयोग केला आहे. " राजकीय परिस्थितीमुळें कां होईना, या प्रतिभावंताची प्रतिभा एकारली होती. प्रचलित राजकारण हाच एक विषय तिचा झाला होता. स्वातंत्र्य-पारतंत्र्य याच परिभाषेमध्यें ती विचार करूं शकत होती. " ( का. नि. नि. भाग ९ वा, पा. १५, प्रा. जोग ). " Where ignorance is bliss, it is folly to be wise " या वचनानें ते पारतंत्र्यांतील ज्ञानानें टॅंटॅलस राजासारखी होणारी दुरवस्था वर्णून सांगतात. त्यांची स्वातंत्र्याची तळमळ इतिहासपूत होती. तिला आर्थिक समतेच्या विचारांचें पाठबळ होतें. " देशांत संपत्ति नाहीं म्हणून देश भिकार होऊं शकतो किंवा देशांत संपत्ति असूनहि तिची योग्य वांटणी झालेली नसली म्हणजे देश भिकार होतो. " ( का. नि. नि. भाग १ ला, गरीबांची उपासमार ). " दुपारीं पोट भरलें तर रात्रीं कसें भरेल हा विचार त्याला कधी सोडीत नाहीं. ... पण हा विचार जसजसा वाढत जातो तसतशी मनुष्याच्या अंगच्या क्रूरपणाची, निर्दयपणाची, आणि लबाडपणाची कमाल होऊन जाते. ह्या दूरदर्शीप्रमाणें मनुष्याच्या पोटांत संचय करण्याची बुद्धि उत्पन्न होतें. आणि ही बुद्धि संपत्तीच्या दुरुपयोगाला पुष्कळ अंशीं कारणीभूत होते. ( कित्ता, भाग १ ला, संपत्तीचा दुरुपयोग ). ही विचारसरणी केवळ भूतदयेतून उत्पन्न झाली होती असें म्हणणें म्हणजे परांजप्यांच्या पाश्चात्त्य विद्याव्यासंगाकडे दुर्लक्ष करण्यासारखें आहे. शिवाय अद्ययावत् साम्यवादी समता परांजप्यांच्या लेखांत शोधणें म्हणजे कालविपर्यासाचा दोष पदरीं घेणें होय. तरी पण यासारखे विचार परांजप्यांच्या इतर ऐतिहासिक लेखांतहि जुन्या घटनांचा नवीन अन्वयार्थ लावतांना ज्याअर्थीं आढळतात त्याअर्थीं त्यांत नवीन विचारांची प्रेरणा होती हें सत्यान्वेषी टीकाकारास नाकारतां येणार नाहीं.

## भाषावैभव आणि कल्पनाविलास

स्वातंत्र्यस्पृहेचा प्रचार चौफेर धुमधडाक्यानें करतांना परांजप्यांनी विविध वाङ्मयीन युक्त्याप्रयुक्त्यांचा विपुल उपयोग केला. या ठिकाणी त्यांच्या संस्कृत भाषेच्या सखोल अभ्यासाचा त्यांना भरपूर उपयोग करता आला. व्यंजना, वक्रोक्ति, उपरोध, उपहास हीं त्यांचीं कालानुरूप उपयोगी पडणारीं प्रभावीं अस्त्रें ! सरळ बोलण्याची चोरी असल्यामुळें ब्रिटिश राजवटीचे दोष दाखवितांना त्यांनी वक्रोक्तीचा भरपूर उपयोग केला.








पारतंत्र्याविषयीं बेसुमार चीड, त्वेष, तिरस्कार अत्यंत कडवटपणें व्यक्त करूनहि त्यांच्या लेखाची समाप्ति दुर्दम्य आशावादांत झालेली आढळते. याचें कारण त्यांची आस्तिक्य बुद्धि आणि श्रद्धाळु मन यांत सांपडतें. स्वतःचा जन्मदिन हा सुतकदिन मानणाऱ्या स्विफ्ट्शीं परांजप्यांसारख्या अंतर्बाह्य आशावादी, स्वातंत्र्याकांक्षी आत्म्याची तुलना करणें गैर आहे. स्विफ्ट्चा उपरोध निराशेनें काळवंडलेला, तर परांजप्यांचा आशावादानें रसरसलेला !

त्यांच्या वक्रोक्तीचें शस्त्र राज्यकर्ते आणि नादान स्वकीय अशा उभयतांवर उगारलेलें होतें. नादान स्वाभिमानशून्य ग्रंथकार कवींविषयीं त्यांचे उद्गार पाहाः " कोणताहि गुलाम नारसिंहाची गोष्ट लिहूं शकणार नाहीं. परंतु तीच दृष्टि दामाजीपंत आणि सेना न्हावी यांच्या गोष्टींकडे वळवा म्हणजे आपल्या दृष्टीला काय दिसतें ! ह्या गोष्टीं ज्यांनी रचिल्या, किंवा त्या खऱ्या घडल्या असल्या तर त्या ज्यांना मान्य झाल्या, त्यांच्या गुलामगिरीची छाया यांमध्यें स्पष्ट दिसत आहे. मुसलमानांच्या गुलामगिरींत राबत असलेल्या कवींच्या, ग्रंथकारांच्या आणि साधुसंतांच्या लेखणींतून असल्या गुलाम देवाशिवाय दुसरें चित्र निघणें शक्यच नव्हतें. " (जसे लोक तसे त्यांचे देव). " धर्म हा मूळ देवानें अशक्त बायकांमुळें आणि अज्ञानी भटभिक्षुक यांचा वेळ जाण्याकरितां केलेला आहे. " " अर्वाचीन उपयुक्त धर्मशास्त्रांत खून हा गुन्हाच नाहीं असें नाहीं. पण तो केव्हां होतो याबद्दल मात्र सूक्ष्म विचार केला पाहिजे. फक्त एकच मनुष्य मारला, तर तो खून होतो ! राजरोसपणा न पत्करतां किंवा जाहीरनामें छापून ती गोष्ट प्रसिद्ध न करतां एखाद्याला चोरून मारलें तर तो खून होतो. अतिशय सुधारलेल्या साधनांचा आणि हत्यारांचा उपयोग न करतां कोयती, पहार, कुऱ्हाड, सोटे, दगड वगैरे रानटी उपायांनी जर एखाद्याचा प्राण घेतला गेला, तर तो खून होतो ! खून ओळखण्याचे असे हे बारीकसारीक भेद आहेत. थोड्या पैशासाठीं किंवा एखाद्या लहानशा इस्टेटीसाठीं एखाद्याला मारलें, तर तोहि खून होतो. हीं ठिकाणें वर्ज्य करून बाकीच्या ठिकाणीं अलीकडच्या उपयुक्त धर्मशास्त्रानें खुनाची पूर्ण संमति दिली असल्याचें हल्लींच्या प्रतिष्ठित लोकांच्या वृत्तीवरून दिसत आहे." (अर्जुनाचा वेडेपणा). "साम्राज्य हा देव, कोणताहि न्याय किंवा अन्याय करून त्या साम्राज्याचा प्रसार करणें हें पुण्य आणि इतरांनीं स्वदेशभक्तीनें प्रेरित होऊन अतिशय प्रिय अशा स्वदेशाच्या संरक्षणासाठीं त्या प्रचाराच्या आड येणें हें पाप, अशी आजकालची स्थिति आहे. " " रक्ताचे डाग, फार झालें तर साबण लावून धुतले म्हणजे जातात, एवढी साधी रसायनशास्त्रांतील गोष्ट अर्जुनाला माहीत नसावी हें लज्जास्पद आहे. " (अर्जुनाचा वेडेपणा). " All perfumes of Arabia will not sweeten this little hand. " या मॅक्बेथमधील पंक्तीवरून ही कल्पना तर सुचली नसेल ना ! "पूर्वी इंग्रज लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांची भाषा नेटिवांना समजत नव्हती, म्हणून नेटिव त्यांच्यापाशीं पृथ्वीवरील मोक्ष म्हणजे थोड्या पगाराची आणि पुष्कळ त्रासाची नोकरी मागण्यासाठीं गेले असतां कोणी दुभाष्या मनुष्य लागत असे. " 'ईश्वर विभु आणि नित्य आहे.' 'एका खडी फोडणाराची गोष्ट,' 'विषासाठीं कंठशोष,' 'दगडी कोळसा,' 'एक पुराणांतरींची नवीन सांपडलेली गोष्ट,' ध्रुवाची गोष्ट खोटी आहे,' 'सगळेच नरसू' इत्यादि सर्व लेख आमूलाग्र वक्रोक्ति आणि उपरोध यांनी भरलेले आहेत. बानगीदाखल येथें कांहीं उतारे सादर केले आहेत.

'माझी मराठी भाषा कुठल्याहि विषयाचें वाहन होऊं शकतें' हा विष्णुशास्त्र्यांनीं निबंधमालेनें कृतींत आणिलेला विचार परांजप्यांनी अधिक खरा करून दाखविला. संस्कृतांतील श्लेषपूर्ण रचना, कल्पनाविलास, रूपकें, अलंकार आणि लयबद्ध रचना यांचा मोठ्या आत्मविश्वासानें उपयोग करून मराठीला प्रौढत्व, अर्थगांभीर्य, रचनासौष्ठव आणि खानदानीपणा यांचा लाभ परांजप्यांनी करून दिला. शिवाजीचें पुण्याहवाचन या लेखांत वेणीसंहारांतील 'चत्वारो वयमृत्विजः' इ. श्लोकांतील रणयज्ञाचें रूपक शिवाजीला कसें तंतोतंत लावून दाखविलें आहे पाहा; " शिवाजी हा त्या यज्ञांतील यजमान आणि त्याची भवानी तरवार ही यजमानपत्नी होय. सर्व महाराष्ट्रदेश हें त्या यज्ञाचें स्थंडिल व्हावयाचें होतें. श्रीसमर्थ रामदास आणि श्रीसाधुवर्य तुकारामबुवा हे त्या रणयज्ञाचें कर्म निर्दोष कसें चालवावें, ह्याविषयीं उपदेश करणारे व्हावयाचे होते. त्या रणयज्ञाच्या होमकुंडांतून निघणाऱ्या








सत्रालांमध्यें हिंदुस्थानचें दुःख, दारिद्र्य आणि पारतंत्र्य यांचें हवन करावयाचें होतें, आणि हिंदुस्थान देशाचें स्वातंत्र्य हें फळ यज्ञभोक्ता आणि यज्ञस्वरूपी जो नारायण त्याच्यापासून सर्व हिंदुस्थानकरितां संपादन करून घ्यावयाचें होतें." "एखाद्या निर्घृण राजाप्रमाणें सूर्य आपल्या हजारों करांनीं पृथ्वीवरील लोकांचें जीवन आकर्षण करून घेण्याला उद्युक्त झालेला असतो." "हलक्या लोकांप्रमाणें ज्याची जोड्याशींच असण्याची योग्यता, असले रजःकणसुद्धां आपलें स्थान सोडून वर येऊन डोळ्यास त्रास देऊं लागतात." (ईश्वरांची लीला अगाध आहे). "एकूण तुमच्या कटामध्यें हे पक्षी देखील सामील आहेत ना? अथवा त्यांत काय आश्चर्य आहे! स्वतंत्रतेच्या पक्षाला कोण पाहिजे तो मदत करील!" (शिवाजीची एक रात्र). "तुम्हां म्हांना देखील केव्हांतरी ग्रहदशा असलीच पाहिजे." (शिवाजीची एक रात्र). "ज्यांना पर्वत म्हणजे दगड आणि माती यांचा गोळा असें वाटतें, त्यांच्या डोक्यामध्यें दगड आणि मुखामध्यें माती परमेश्वरानेंच भरली असली पाहिजे." (माझ्या पर्वता).

भव्य आणि विशाल कल्पना खालील कांहीं वाक्यांत आढळतात: "चोहोंकडे उष्णतेचा पूर्ण अंमल बसतो, व खाली तळ व वर पृष्ठभाग अशा रीतीनें पाण्यानें भरलेले जे अनेक महासागर पृथ्वीच्या पाठीवर आहेत त्यांच्याहून, म्हणजे वर तळ आणि खाली पृष्ठभाग अशा रीतीनें उपडा केलेला हा आकाशांतील उष्णतेचा महासागर ह्या भूमंडळावर ओतून, त्यांत आपणां सर्वांना गाडून टाकण्याचा प्रयत्न हा सूर्य करीत आहे काय, असा पाहणाराला भास होत असतो." (ईश्वराची लीला अगाध आहे). "प्रतापगड, रायगड, तोरणा, राजगड वगैरे ठिकाणचें पूर्वकालीन राजांचें वैभव आणि स्वतंत्रतेचें सामर्थ्य नाशाप्रत गेलेलें पाहून त्यांचीं उंच उंच शिखरें खिन्न होतात, आणि झऱ्यांच्या विशुद्ध पाण्याच्या रूपानें त्यांच्या डोळयांतील अश्रु टपटप खालीं गळत असलेले प्रवासी लोकांच्या नेहमीं नजरेस पडतात." (सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति). 'सह्याद्रिच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति' या निबंधांतील शंकराच्या विशाल महापूजेची कल्पना म्हणजे परांजप्यांच्या कल्पनाशक्तीनें निर्मिलेलें नितांत रमणीय गद्यकाव्यच होय. विचारांची आणि रचनेचीं लयबद्ध आंदोलनें, क्वचित् उपरोध, उपहास यांच्या मिश्रणानें मोठी खुमासदार बनल्याची उदाहरणेंहि सापडतात. "लोकांच्या खिशांत जेव्हां पैसे येतात तेव्हां ते घामानें भिजून येतात. परंतु जेव्हां ते बादशहाच्या खजिन्यांत जातात तेव्हां रक्तानें ओले होऊन जातात" (दिल्लीचें तख्त आणि भाऊसाहेबांचा घण). त्याचप्रमाणें "ब्लॅकहोल" या निबंधांत परांजप्यांनी भौतिक शास्त्रांच्या अभ्यासाविषयीं आस्था न बाळगून आम्ही रूढींचीं कुंपणें आपल्याभोवतीं उभीं केल्याबद्दल स्वकीयांना दोष दिला आहे. "आम्ही सगळयांत पहिले गुलाम! परकीयांनी येऊन पहिल्यानें आपलें पश्चिमात्य राज्य स्थापन करून ज्या प्रदेशाला पावन केलें तो आमचा गोव्याचा प्रदेश होय. हिंदुस्थानच्या गुलामगिरीच्या रांगेंत अग्रभागीपणाचा मान आम्हांला! हिंदुस्थानांतील सर्व गुलाम एकत्र बसून गुलामगिरीचे वेदोक्त मंत्र म्हणण्याचा प्रसंग आल्यास 'श्रीमन्महा' म्हणून सुरुवात करण्याचा अधिकार आमचा! (उच्च पर्वताच्या उच्च शिखरावर).

'दिल्लीचें तख्त आणि भाऊसाहेबांचा घण' या निबंधांतील श्रीवर्धनाहून देशावर आलेल्या भट घराण्याच्या स्थितींत पडलेला फरक सदाशिवराव भाऊंच्या उदाहरणानें तुलनेनें स्पष्ट केला आहे. हा लेख १९०१ मधला आहे. तात्यासाहेब केळकरांच्या 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' या १९१०-११ सालच्या लेखमालेंत रँ. परांजप्यांचें वर्णन केलें आहे. या दोन वर्णनांतील साम्य उल्लेखनीय आहे. (समग्र केळकर, खंड ११, पा. २३-२४). "यांचें घराणें वैदिकांचें असून खुद्द त्यांचे वडील कोकणपट्टींतील उत्कृष्ट दशग्रंथी ब्राह्मणांत मोडत असत; आणि या चिरंजीवांची अल्पवयांत दिसून येणारी बुद्धिमत्ता पाहून त्यांनीहि दशग्रंथी ब्राह्मण व्हावें अशी त्यांच्या वडिलांची इच्छा होती असें म्हणतात. पण दैवाचा संकल्प कांहीं वेगळाच होता. कोकणांत राहून वेदाभ्यासाकडेच ते लागते—त्यांच्या पायांना देशाची वाट न सांपडती किंवा त्यांना हातीं धरण्यास धोंडोपंत कर्व्यांसारखा आधुनिक विद्वान् न मिळतां-तर 'रघुनाथा'स पंत ही पदवी न लाभतां भट्ट ही पदवी लाभली असती; इंग्लंडांत कॅम नदीकांठच्या कॉलेजच्या बोर्डिंगांत 'साईन थीटा, कॉस






थीटा ' या शब्दांचा पाठ तोंडांतून निघण्याऐवजीं, मुर्डी गांवामधील एका लहानशा घराच्या परसांतील आवारांत नारळी पोफळींना रहाटगाडग्याचें पाणी लावीत वेदांतील ऋचांच्या जटपाठांचीं व घन-पाठांचीं त्याचीं आवर्तनें चालतीं. "

**परंपरा किंवा प्रगति !**

" त्यांची राजकीय क्रांतीची कल्पना ही परंपरेच्या अभिमानानें भरलेली होती हें लक्षांत न घेऊन चालत नाहीं. तेव्हां एकंदरीनें विचार करतां असें वाटतें कीं, शिवरामपंत हे वृत्तीनें आणि विचारानें परंपरावादी होते असें म्हटल्यास त्यांचेवर अन्याय होणार नाहीं. शिवरामपंतांची बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता या वादांतीत वस्तु आहेत. त्यांचा बुद्धिवाद हा त्यांच्या भावना-शीलतेपेक्षां प्रबळ होता काय, जो थोडाफार बुद्धिवाद त्यांनी दाखविला असेल तो सर्वंकष स्वरूपाचा होता काय, याचा अत्यंत तटस्थ वृत्तीनें विचार होणें आव-श्यक आहे, आणि तसा विचार करूं लागल्यानंतर या प्रश्नांचें ठाम अस्तिपक्षीं उत्तर देणें कठीण आहे. " ( प्रा. देशपांडे, आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग १ ला. पा. २४३-२४४ ). या मताचा रोख सामाजिक, धार्मिक सुधारणांच्या बाबतींत परांजपे परं-परेला मानणारे होते असा आहे. हें मत चिंत्य असून त्याचा थोडा व्यापक आणि ऐतिहासिक दृष्टीनें विचार होणें अगत्याचें आहे. " मूल प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व " न सोडण्याचा संकल्प भारतीय बुद्धिवाद्यांचे अग्रणी आगरकर यांनी ' सुधारक काढण्याचा हेतु ' या पहिल्या अग्रलेखांत केला आहे. शिवाय प्रा. देश-पांड्यांनी " दुर्दैवानें चिपळूणकर हे प्रगतिवादाचे विरोधक होते अशी आवई उठवून देण्यांत आली आहे. शास्त्रीबोवांचे लेख म्हणजे जुन्याची सरसहा तरफदारी अशीं एकान्तिक विधानेंहि केलीं गेलीं आहेत. ती आवई जशी खोटी, तशीं हीं विधानेंहि खोटीं, आहेत. " ( आ. म. वा. इ. पा. १५५ ) अशा शब्दांत चिपळूणकरांना प्रगतिवादी ठरविलें आहे. टिळकांना मात्र त्यांनी परंपरावादी ठरविलें आहे. वरील तिघांशींहि परांजप्यांचा शिष्यसंबंध होता. यावरून त्यांचीं मतें परांजप्यांनी सर्वथैव स्वीकारलीं होतीं असें मला मुळींच सुचवावयाचें नाहीं. टिळकांनीं विचार प्रगति-वादी असूनहि धोरण म्हणून जुन्याची तरफदारी केली. परांजप्यांनी सुधारकांचा उपहास केला, सुधारणांचा नव्हे; ही गोष्ट त्यांचे निबंध साक्षेपानें अभ्यासणाऱ्यास पटल्यावांचून राहणार नाहीं. " अल्पवयांत आया झालेल्या मुली आणि ब्रह्मचर्याश्रमाबरोबरच गृहस्था-श्रमामध्यें पाऊल टाकलेले बाप, धर्माची ओळख विसर-लेले ऋत्विज, कापसाच्या गादीवर बसलेले राजे आणि आपल्या राजाचें अहित चिंतणाऱ्या प्रजा, सरकारी पगारांनी हातपाय बांधलेले विद्वान् लोक आणि अज्ञानानें हातपाय बांधलेले अशिक्षित लोक, अकालीं पडणारा पाऊस आणि जन्मास येणारी संतति, अल्पा-युषी प्रजा, पाण्यावांचून डोळे, जोरावांचून मनगटें, रुंदीवांचून छात्या, बुद्धीवांचून डोकीं, चपळपणावांचून पाय व साहसावांचून मनें, अशा प्रकारचे उद्वेगजनक आणि डोळ्यांतून टिपें ओढून काढणारे देखावे आपल्या-मध्यें पदोपदीं दृष्टीस पडतात " ( ब्लॅक होल ). हें वाक्य आगरकरांच्या लेखणीतून उतरल्यासारखें तिखट आहे. " हा सुधारक लागोपाठ आज तेरा वर्षें सामाजिक परिषदांमध्यें निरनिराळ्या विषयांवर बोलत आला आहे. पण यानें सुधारणेची अमुक एक गोष्ट केली, असा आळ धर्माभिमानी लोकसुद्धां याच्या-वर घालण्याला धजणार नाहींत. ... छे, छे, मी स्वत:करितां मुळींच भांडत नाहीं. आमच्या घरीं माझ्या वडील मामांच्या पुतणीची काकी आहे तिनें मला अजून पुनर्विवाहाची परवानगी दिली नाहीं, सबब मी आपल्यासाठीं भांडत नाहीं. माझें भांडण तत्त्वासाठीं आहे, व्यक्तीसाठीं नाहीं. (स्वयंवर व संकुल युद्ध ). " राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या आड आपले जातिभेद येत असतील तर अश्वत्थाम्याप्रमाणें ' इयं सा जातिः परित्यक्ता ' असें आपण म्हटलें पाहिजे. " १९२० च्या टिळकजयंतीनिमित्त भाषण.

परंपरेंत टिकाऊ आणि टाकाऊ असे दोन भाग असतात. त्यांतील पहिल्याला धर्म, नीति असें, आणि दुसरीला रूढी असें अभिधान स्थूलमानानें देतां येईल. शिवाय परकयांचें राज्य नाहीसें करून राजकीय मोक्षावर सर्व लक्ष एकाकार केलें म्हणजे धोरण म्हणून सामाजिक धार्मिक सुधारणांकडे तितकेसें लक्ष पोचवितां येत नाहीं. परांजप्यांनी घरगुती आणि सार्वजनिक जीवनांत रूढीचा अंगीकार केल्याचीं उदाहरणें उपलब्ध नाहींत. शिवाय बाह्य स्वरूप कायम ठेवून अंतरंगांत क्रांति








करणें ही सुधारणा करण्याची मान्य पद्धत आहे. 'आधुनिक भारतां'तील हें विचार या दृष्टीनें विचारणीय आहेत. " तात्पर्य, सामाजिक, धार्मिक व राजकीय संस्थांचें मूळ बाह्य स्वरूप कायम ठेवून त्याच्या अंतरंगांत क्रांति घडवून आणण्याची एक सुधारणावृत्ति व सुधारणाप्रवृत्ति जगाच्या इतिहासांत आढळतें व ही वृत्ति ब्रिटिश लोकांतहि व हिंदु लोकांतहि अनेक वर्षांच्या परंपरेनें रुजलेली आहे. श्रीकृष्ण, शंकराचार्य व भागवतधर्मीय साधुसंत यांनी या वृत्तीचाच अवलंब केला व हिंदुसमाजांत फैलाव केला आणि लो. टिळक आणि महात्मा गांधी यांनी याच वृत्तीचा अवलंब सामाजिक, धार्मिक व आर्थिक बाबतींत करून परकीय सत्तेविरुद्ध चालूं असलेलें राष्ट्रीय क्रांतीचें कार्य आधुनिक भारताच्या इतिहासांत नेटास लाविलें. हिंदुस्थान परतंत्र असल्यामुळें व आपल्या संस्कृतींत सर्वांगीण क्रांति घडून येणें अवश्य असलें, तरी तें कार्य राष्ट्रीय स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत अशक्य असल्यामुळें केवळ राजकीय बाब सोडिल्यास इतर सुधारणांच्या कार्यांत ही वृत्ति व पद्धति अवलंबिणें त्यांस आवश्यक व इष्ट वाटलें. लो. टिळक व महात्मा गांधी यांच्या राजकीय क्रांतिवादाचा आणि सामाजिक, धार्मिक अथवा आर्थिक क्षेत्रांतील नेमस्त वृत्तीचा उलगडा असा होऊं शकतो; व त्याचें खरें समर्थन व कारण हेंच आहे. राजकीयेतर सुधारणांस विरोध हें त्याचें खरें कारण नव्हे, असें आमचे मत आहे."
( आवृत्ति दुसरी, पा. ५२२–५२३ )

तात्पर्य, परांजपे विचारानें प्रगतिवादी असले तरी त्यांनी राजकीय मोक्षाचें ध्येय प्रमुख म्हणून स्वीकारिलें असल्यामुळें त्याचाच केवळ सर्वतोपरी प्रचार केला. राजकीय मोक्षाच्या ध्येयांत विघ्न निर्माण करणारे केवळ बोलघेवडे सुधारक त्यांच्या उपरोधउपहासाचा विषय झाले तर त्यांत नवल नाहीं. अशा शब्दशूर सुधारकांमुळें सुधारणेचे पाऊल पुढें न पडतां राजकीय ध्येयापासून लोकांचें लक्ष तात्पुरतें उडण्याचा धोका त्यांना स्पष्ट दिसत होता.

## क्रांतिनिष्ठ अनुयायी

निष्ठावंत प्रचारक आणि अनुयायी ही परांजप्यांची भूमिका ! १९२० पर्यंत लो. टिळकांचे आणि नंतर २९ पर्यंत म. गांधींचे अनुयायी. या त्यांच्या दोन भूमिकांत तमः 'प्रकाशवत् भेद आढळतो' असें म्हणणारा लोकमान्यानुयायी वर्ग महाराष्ट्रांत आहे. आपण लो. टिळकांचे शिष्य असल्याची कबुली परांजप्यांनी कैक वेळां दिली आहे किंबहुना टिळकांच्या 'लोकमान्य' पदवीचा आरंभ 'लोकमान्य आणि राजमान्य' या लेखापासून झाला.

परांजप्यांची मनोबुद्धि क्रांतिनिष्ठ आणि निर्भय होती. 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें' यांतील 'रण' शब्दाचा नेहमीचा मान्य अर्थ घेऊन सशस्त्र क्रांतीला उत्तेजन देण्यासाठीं त्यांनीं स्वपर इतिहासांतील स्फूर्तिप्रद दाखले मोठ्या हिरीरीनें आपल्या निबंधांत दिले. परंतु लो. टिळकांची या संबंधींची सावधानता उत्तरोत्तर त्यांना पटल्याचीं चिन्हें त्यांच्या लेखनांत स्पष्ट दिसतात. म. गांधींच्या महाराष्ट्रीय अनुयायांत ते आघाडीवर राहिले याचे कारण त्यांची क्रांतिनिष्ठा आणि निर्भय वृत्ति. अहिंसक-शांततापूर्ण-असहकारी लढ्यांत त्यांस नवीन चैतन्य दिसूं लागलें आणि राष्ट्रीय सभेप्रमाणें त्यांनींहि धोरण म्हणून या लढ्यांत सर्वस्व ओतलें. यांत ते तत्त्वभ्रष्ट आणि पक्षभ्रष्ट झाले असें म्हणणारे म्हणोत बिचारे ! लो. टिळकांच्या राजकारणाची धुरा ज्याप्रमाणें म. गांधींनी सुसंगत आणि न्याय्य रीतीनें घेतली त्याचप्रमाणें लो. टिळकांच्या अनुयायांपैकीं कांहींनी त्यांच्या पश्चात् म. गांधींचें अनुयायित्व पत्करणें हा नियत ऐतिहासिक विकासक्रमच होय. " पण त्यांच्या ( लो. टिळकांच्या ) निधनानंतर त्यांच्या राजकारणांतील 'उत्साह' म. गांधींना येऊन मिळाला; आणि 'सावधगिरी' तेवढी उत्साहाचें खोबरें टाकून केळकरपक्षांत उरली ! त्यांच्या ह्यातींत ज्या उत्साही लोकांनी आपल्या अंतःकरणांत क्रांतिवृत्तीची वाढ व जोपासना केली होती, ते लोक म. गांधींच्या निःशस्त्र क्रांतिवादांत सामील झाले; आणि ज्यांनी सावधगिरी जवळ ठेवून आंतील क्रांतिवृत्ति गमावली, ते अवेळीं राष्ट्राला व राष्ट्रसभेला सावधगिरीचा मंत्र उपदेशीत देशांत वाढणाऱ्या क्रांतिवादापासून अलग झालें. " ( आधुनिक भारत, पा. ३९१. ) ६ ऑक्टो. १९०५ मध्यें 'काळां'तील स्फुटांत 'Passive Resistance' या शब्दाचा अर्थ स्पष्ट करून तसा प्रकार आपल्याला शक्य व पथ्य आहे असें त्यांनीं म्हटलें आहे. कलकत्ता कॉंग्रेसनंतर











ता. १९ सप्टेंबरला ( १९२० ) राष्ट्रीय पक्षाची म्हणजे टिळकांच्या अनुयायांची सरदारगृहांत सभा भरली. ' त्यांत ज्या बाबीनें ' रेव्होल्युशन ' जवळ येईल, ती बाब आधीं हातीं घ्यावी ' असेंच त्यांनीं आपलें मत म्हणून सांगितलें होतें.

यावरून परांजप्यांच्या क्रांतिनिष्ठेंतून त्यांच्या गांधीयुगांतील अनत्याचारी असहकार आणि कायदेभंग, करबंदी यावरील निष्ठेचा उगम होणें क्रमप्राप्त होतें. ' स्वराज्यां 'तील कांही अवतरणांवरून याची चांगली कल्पना येते. " अत्याचार आणि अनत्याचार या दोन्ही तत्त्वांच्या मुळाशीं एक प्रचंड शक्ति आहे, ही गोष्ट म. गांधींनी ओळखली होती ... ... या अनत्याचाराच्या चळवळीने म. गांधीं हिंदुस्थानांतील लोकांच्या हातांत एक सामर्थ्य आणून देत होते. ... हे महाराष्ट्रांतील प्रतिष्ठित अत्याचारी गेल्या दीड वर्षांत अत्याचाराचा गुप्त आणि उघड उपहास करण्याचें सोडून देऊन म. गांधींच्या मदतीला आले असते, तर म. गांधीचा आणि हिंदुस्थान देशाचा बराच कार्यभाग सुलभ झाला असता. " स्व. नि. नि. पा. १२०.

परांजप्यांच्या लेखनांतील वक्रोक्तीचें तेज ' काळो'त्तरकालीन लेखनांत आढळत नाहीं असाहि एक आक्षेप घेण्यांत येतो. पण याला पुरावा नाहीं. 'स्वराज्यां'तील आणि ' साहित्यसंग्रहां'तील महाराष्ट्रांतील प्रतिष्ठित अत्याचारी, अर्धनाशे समुत्पन्ने सर्वं त्यजति पंडितः ! एक पुराणांतरींची नवीन सांपडलेली गोष्ट, मदनदहन, नवी सृष्टि, भासाची भवितव्यता यांसारख्या कित्येकांत उपरोध, उपहास, कल्पनाविलास यांची पूर्वीइतकीच विपुल पखरण कोणालाहि स्पष्ट दिसेल. वाणी, लेखणी यांचा देशसेवेसाठीं उपयोग करणारे परांजपे कृतींत-देहदंड सोसण्यांत कधीं मागे घेणारे नव्हते. १९०८ सालचा एकोणीस महिन्यांचा दीर्घ कारावास आणि मुळशी सत्याग्रहांतील साठीच्या सुमाराचा सहा महिन्यांचा कारावास ही गोष्ट सिद्ध करण्यास समर्थ आहेत. गांधीयुगांत उघड बोलण्याची वेळ आली हें ओळखून वक्रोक्ति, उपरोध यांचा त्यांनी बहुतांशीं त्याग केला. शिवाय ते उत्तम, निर्भय, निष्ठावंत, करारी प्रचार अनुयायी होते हें सत्य लक्षांत ठेविल्यास त्यांचें वाङ्मय आणि कर्तृत्व समसमान आहेत असा निर्वाळा द्यावा लागेल. श्री. कालेलकरांच्या शब्दांत अशा दुराराध्य टीकाकारांना असें उत्तर देतां येईल. " मनुष्यानें एखादें सत्कृत्य केलें तर त्याने शतकृत्य केलें नाहीं म्हणून तो कमी ठरतो अशी टीका केव्हांहि कोणावरहि करतां येईल. गाय घोडा नाही किंवा घोडा गाय नाहीं हाहि त्या त्या प्राण्यांचा दोष आहे असें म्हणतां येईल. यात्रेकरूंना त्यांच्या निजधामाचा रस्ता अचूकपणें दाखविणाऱ्या रस्त्यावरील मार्गदर्शक पाटीलाहि म्हणतां येईल कीं, ' तूं रस्ता दाखवितेंस तर चालून कां दाखवीत नाहीस ? " ( का. नि. नि. भाग १० वा, ग्रस्तमुक्तांचें अभिनंदन, पा. ४ ) परांजप्यांच्या संशोधनपर कित्येक लेखांचें स्वतंत्रपणें रसग्रहण करणें अगत्याचें आहे. त्यांत त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता, प्रतिभाविलास, सुंदर भाषाशैली आणि सूक्ष्म संशोधनपरता वैपुल्यानें आढळतात.

भारताच्या दशकापूर्वी मिळालेल्या नवीन स्वातंत्र्याची जपणूक करणारे निष्ठावंत संपादक आणि कार्यकर्ते आज हवे आहेत. अशावेळीं परांजप्यांसारख्या पंडित, रसिक, इतिहासज्ञ, सत्यान्वेषी आणि स्वाभिमानी, तळमळीच्या देशसेवकाची उणीव भासल्यावांचून रहात नाहीं. " विषयाचें तर्कशुद्ध प्रतिपादन, विषयाची उपक्रमोपसंहारादि मांडणी, भाषेची सजावट, लेखांचें तात्पर्य वाचकांच्या मनावर ठसविण्याची शैली, विषयानुरूप अलंकारांची योजना ' या गोष्टी त्यांच्या लेखनांत प्रकर्षानें आढळतात म्हणूनच त्यांचें वाङ्मय मराठी भाषा सुंदरीचा अमोल अलंकार आहे.










श्री. चिं. रा. बोंद्रे

# खर्चावरील कर–एक टिपणी

भारतांतील करपद्धतीची पहाणी करण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें प्रसिद्ध ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ डॉ. निकोलस काल्डॉर यांची, ते १९५५ मध्यें हिंदुस्थानांत आले असतांना, नेमणूक केली होती. डॉ. काल्डॉर यांनी आपल्या कामास १९५६ चे जानेवारीचे मध्यांत सुरुवात केली व त्याच वर्षांतील मार्च अखेर आपल्या कामाचा अहवालहि सादर केला. उण्यापुऱ्या दहा आठवड्यांत एवढ्या महत्त्वपूर्ण विषयावर दिलेला हाच पहिला अहवाल असावा. हा अहवाल आतां ( Indian Tax Reforms ) या नांवानें प्रसिद्ध झाला आहे.

यापूर्वी १९५५ चे फेब्रुवारी महिन्यांत (Taxation Enquiry Commission) कर चौकशी समितीचा अहवाल प्रसिद्ध झाला होता. असें असतांना इतक्या महत्त्वपूर्ण विषयावर एक वर्षाचे आंत डॉ. काल्डॉर सारख्या एकाच व्यक्तीकडून अशी पहाणी करण्याची कां गरज भासावी हें समजत नाहीं. प्रत्येक सरकारी चौकशींत अगर पहाणींत पुढल्या पहाणीचे अगर चौकशीचे बीज रोवलेलें असते; परंतु प्रत्येक चौकशी ही परिपूर्ण असते असें म्हणतात हेंच ह्याहि बाबतींत खरें असावें.

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कर विषयक अहवालामध्यें डॉ. काल्डॉर यांचा हा अहवाल खूपच प्रक्षोभक निबंध आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण, या अहवालांत त्यांनी ज्या कर आकारणीच्या पद्धती सुचविल्या आहेत त्या प्रचलित पद्धतीपेक्षां अगदीं वेगळ्या व बऱ्याचशा क्रांतिकारकच समजल्या जातील. डॉ. काल्डॉर यांनी कर आकारणीसाठीं मुख्यत्वें नवीन पांच कर सुचविले आहेत. ते म्हणजे ( १ ) संपत्तीवरील ( २ ) भेटी अगर आहेर यांच्यावरील ( ३ ) ( ३ ) मुद्दलवाढीवरील ( ४ ) खर्चावरील आणि ( ५ ) प्राप्तीवरील मवाळ स्वरूपाचा कर. यां सर्व करांबाबत सूचनेंतील व्यय अगर खर्चावरील कर ( Personal Expenditure Tax ) ही एक नवी कल्पना आहे. या अहवालाचें हें एक मुख्य सूत्र असून डॉक्टरसाहेबांच्या सूचनांचा हा मुख्य पायाच आहे.

खर्चावरील अगर व्ययकराची डॉ. काल्डॉर यांची कल्पना थोडक्यांत अशी आहे : सध्यांच्या सुपर टॅक्स ऐवजी खर्चावर कर बसवावयाचा. भोग्य वस्तूंच्या वापराचे व उपभोगिलेल्या सुखसोयींचे (Services) मूल्य करून व्ययकराची आकारणी करावयाची. ही आकारणी करतांना वापर केलेल्या वरील गोष्टींचा तपशील मागावयाचा नाहीं किंवा त्या कोठून मिळविल्या अगर त्यासाठीं कोणी पैसे भरले अगर किंमत दिली हें बघावयाचे नाहीं. उदा० प्रवासखर्च दुसऱ्याकडून मिळाला असला तरी तो त्या व्यक्तीनेंच खर्च केला असेंच गृहीत धरून त्याच्या एकूण खर्चांत तो खर्च म्हणून धरावयाचा. मात्र करपात्र खर्च कोणता हें ठरवितांना, व्यापारधंद्यासाठीं झालेला वाजवी खर्च, वार्षिक उत्पन्न मिळविण्यासाठीं भांडवल गुंतवणुकीवर खर्च, विशिष्ट भांडवली खर्च आणि देणग्या, आहेर, भेटी यांवरील खर्च जमेत धरावयाचा नाहीं. तसेंच नामकरण व अंत्यविधीसाठीं झालेला खर्च, ठरीव रकमेइतका वैद्यकीय खर्च, शारीरिक अपंगत्वामुळें झालेला खर्च आणि आग, पूर, चोरी वगैरेमुळें झालेला खर्च हे जरूरी सूट ( Necessitous Exemption ) म्हणून, करपात्र खर्चाची रक्कम ठरवितांना, बाद करावयाचे.

कुटुंबांतील प्रत्येक घटकांनी केलेला खर्च प्रथम एकत्र मिळवावयाचा व नंतर प्रौढ व बालकांचे प्रमाण बघून दर डोई विभागणी करून प्रत्येकी खर्च काढावयाचा. यासाठीं तान्हें मूल हा अर्धा प्रौढ समजावयाचा. १० हजार रुपयापर्यन्तचा खर्च करमाफ ठेवून त्यापुढील रकमेवर वाढत्या प्रमाणांत कर आकारणी करावयाची. १० ते १२ हजार पर्यन्त २५ टक्के व



अनुक्रमणिका






५० हजारापुढें किमान ३०० टक्के आकारणी करावी असें डॉ. मजकुरांचें मत आहे.

वरील विवेचनावरून व्ययकर म्हणजे काय याची साधारण कल्पना येईल. आतां ह्या कराची इष्टानिष्टता व त्याचा व्यवहारांत कितपत उपयोग करणें शक्य होईल तें पाहूं. व्ययकराची तरफदारी करतांना सुपर-टॅक्स ऐवजी अशा खर्चावरील कराची आकारणी केली तर कराचा बोजा समप्रमाण पडेल असा मुद्दा डॉ. साहेब पुढें करतात. कारण, त्यांचे मतें ह्या कराची आकारणी करतांना भोग्य वस्तू अगर सुखसोयींच्या वापरांतील असमानता विचारांत घेतली जाते. म्हणजे ज्या प्रमाणांत प्रत्येक व्यक्ति वरील गोष्टी वापरांत आणते त्याच प्रमाणांत तिचेवर कराची आकारणी होते. प्राप्तीकराची आकारणी करतांना उत्पन्नांत किती भर पडते याचाच विचार होतो म्हणून सुपर टॅक्स ऐवजी व्ययकर जास्ती वाजवी आहे. डॉ. मजकूरांनी सांगितलेलें व्ययकरामागील तत्त्व जरी खरें असलें तरी करविषयक धोरण ठरवितांना फक्त करांचा बोजा सम-प्रमाण असावा हेंच एकमेव प्रमाण धरून चालणार नाहीं. कोणताहि नवीन कर बसवितांना व्यक्तिगत शिल्लक, आर्थिक विकासास उत्तेजन, आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण, कर चुकविण्याची प्रवृत्ति आणि कर-आकारणी व वसुलीची व्यवस्था या सर्व गोष्टींवर कसे व काय परिणाम होतील याचा विचार करूनच धोरण ठरविलें पाहिजे.

म्हणूनच वरील सर्व बाबींवर काय परिणाम होतील याचा विचार करणें जरूर आहे. डॉ. काल्डॉर यांचे मतें व्ययकर बसविल्यानें शिल्लक ठेवण्यांस उत्तेजन मिळेल. परन्तु भारतांत तरी सध्यांच्या परिस्थितींत ही शक्यता कमी दिसते. कारण, व्ययकर हा हल्लीं प्राप्ती-वरील कर भरणाऱ्या जादा प्राप्ती असलेल्या गटावरच आकारला जावा अशी डॉ. साहेबांची सूचना आहे. सध्यां तरी सरकारला प्राप्तीवरील कराचे दर कमी करणें शक्य होणार नाहीं. किंवा अप्रत्यक्ष करांचें प्रमा-णहि कमी करतां येणार नाहीं. हे अप्रत्यक्ष कर जास्ती उत्पन्न असलेल्या गटांतील लोकांना भरावेच लागतात. व्ययकर बसविल्यानें करांचा या लोकांवरील बोजा साहजिकच वाढेल व कर भरण्याची शक्ति मात्र वाढणार नाहीं. त्यामुळें ह्यांच्या शिलकींतून कर भरावे लागतील व शिलकींत घट पडत जाईल. सारांश व्यय-कर बसविल्यानें शिल्लक वाढविण्यास उत्तेजन मिळ-ण्याऐवजी ती घटण्याचा संभवच जास्त दिसतो.

व्ययकरांमुळें शिलकींत भर पडेल असें डॉ. साहेबांचें मत वादासाठीं गृहीत धरलें तरी कमी उत्पन्न असले-ल्या व्यक्तींच्या शिलकींत भर पडणें असंभवनीय आहे. डॉ. स्वतःच म्हणतात कीं, या करामुळें पुंजी-पतींची संपत्ति वाढण्यास मदत होईल. यावरून आर्थिक शक्ति केंद्रित होणेस मदत होईल असें अनु-मान निघतें. थोड्या व्यक्तींच्या हातांत आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण होणें आपण ठरविलेल्या समाजवादी समाज निर्माण करण्याच्या ध्येयाला बाधक ठरेल. यावरून शिलकींत भर पडेल या डॉ. च्या मुद्द्यावरहि व्यय-कर बसविण्याची कल्पना ग्राह्य ठरत नाहीं.

व्ययकर बसविल्यास कर चुकविणें थांबवितां येईल असा डॉ. काल्डॉर यांचा दावा आहे. हा दावा मांडतांना खर्चा-वरील कराची आकारणी ज्या लोकांवर होईल, त्यांचे व्यवहार करपात्र लोकांशीच असतील, असें डॉ. मजकुरां-नीं गृहीत धरलें आहे. परंतु एक गोष्ट त्यांच्या नजरेंतून सुटली आहे कीं, प्रत्यक्ष व्यवहारांत ज्यांना प्राप्तिकर भरावा लागणार नाहीं किंवा व्ययकराच्या मर्यादेंत जे लोक येत नाहींत, अशांना देणग्या, आहेर अगर भेटी दिल्या आहेत, असें तक्त्यांत दाखवून वयक्तिक खर्चाची रक्कम कमी दाखवितां येईल. बिनामी व्यव-हार हिंदुस्थानांत प्रसिद्धच आहे. तसेंच लहान-सहान धंदेवाले अगर छोटे व्यापारी यांच्या हिशेबांत धंद्यां-तील उत्पन्न आणि खर्च आणि वैयक्तिक उत्पन्न व खर्च असा वेगळा हिशेब ठेविला जात नाहीं. साहजिकच धंद्यांतील प्राप्ति जास्त दाखवून व धंद्याबाबत खर्च जास्त दाखवून व्यक्तिगत खर्च कमी दाखवितां येईल. यावरून व्ययकर बसविल्यानें कर चुकविणें थांबेल, असा निष्कर्ष काढणें बरोबर ठरणार नाहीं.

एवढें मात्र खरें कीं, कर आकारणीसाठीं प्राप्ति आणि खर्च यांपैकीं खर्चाची व्याख्या जास्त चांगल्या तऱ्हेनें करतां येईल. परंतु व्यवहारांत प्रत्यक्ष खर्च किती झाला हें काढावयाचें असेल तर प्रथम प्राप्ति किती झाली हें पहावें लागेल. त्यानंतर किती भर पडली हें तपासावें लागेल आणि नंतर प्राप्ति व शिलकेंत पडलेली भर या दोहोंमधील फरक हाच खर्च असें निश्चित ठर-










विता येईल. परंतु डॉ. साहेबांच्या सूचनेप्रमाणें करपात्र खर्चावरील कर आकारणी ठरवावयाची असेल तर इन्कमटॅक्स ऑफिसरला प्रथम व्यक्तीचें उत्पन्न किती हें ठरवून त्यांवरून त्या त्या व्यक्तीच्या रहाणीच्या मानाप्रमाणें खर्चाची रक्कम ठरवावी लागेल. म्हणजे कर-आकारणीची पद्धत जास्त क्लिष्ट होईल.

भारतांत एकत्र-कुटुंब-पद्धति असल्यामुळें कुटुंबांत न रहाणाऱ्या, कुटुंबाचे घटक नसणाऱ्या परंतु कुटुंबावर अवलंबून असणाऱ्या व्यक्तीसाठींहि खर्च करावा लागतो. म्हणजे करपात्र खर्च अशा फुगलेल्या खर्चावरून ठरविणें, व कराची आकारणी करणें दुरापास्तच होईल. तसेंच हल्लींच्या विकासयोजनेच्या काळांत भाववाढ सारखी होतच रहाणार हें गृहीतच धरलें पाहिजे. अशा परिस्थितींत व्यक्तीला स्वतःचें रहाणीचें मान कायम ठेवण्यासाठीं भोग्यवस्तु व सुखसोयी यांची जास्त किंमत द्यावी लागेल. आणि जादा होणाऱ्या खर्चामुळें अधिक व्ययकर भरावा लागेल. यावरून हा कर बसविला तर करभरणारांची दोन्हीं बाजूंनी ससेहोलपट होईल हें स्पष्ट दिसून येतें.

सारांश डॉ. काल्डॉर यांनी सुचविलेल्या या व्ययकरामुळें त्यांनी सुचविलेले फायदे होण्याची शक्यता आजच्या परिस्थितींत दिसत नाहीं. शिलकींत भर पडणार नाहीं; आर्थिक विकासास उत्तेजन मिळणार नाहीं; कर चुकविणें थांबणार नाहीं; मात्र कराची आकारणी आणि वसुली यांच्या शासनांत अनेक प्रकारचे अडथळे निर्माण होतील; म्हणजेच आपल्या देशाला तरी त्यांची सूचना उपयोगी ठरणार नाहीं. डॉक्टरांनी सुचविलेल्या या कर-पद्धतीवर अनेक आक्षेप घेतले गेले आहेत व अनेक तज्ज्ञांनी टीका केल्या आहेत. परंतु डॉ. साहेबांच्या या अभ्यासपूर्ण सूचनेवरील त्यांनी स्वतः केलेली टीका त्यांच्याच शब्दांत सांगणें अत्यंत उचित ठरेल.

" प्रचलित प्राप्तीकरपद्धति ऐवजीं व्ययकरपद्धति अंमलांत आणणें जास्त घोटाळ्याचें होईल हाच या पहाणीचा निष्कर्ष आहे. ही पद्धति अंमलांत आणल्यानें कर भरणारी व्यक्ति व महसूल अधिकारी यांच्यावर अधिकच ताण पडेल. लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं प्राप्तिकराचे गादीवर व्ययकर बसविण्याचा विचार अशक्यच आहे. प्राप्तिकराची अंमलबजावणी करण्यांत आज शंभराहून अधिक वर्षांचा अनुभव आलेला आहे. तशा तऱ्हेचा अनुभव खर्चकराचे बाबतींत नाहीं आणि तसा अनुभव मिळाल्याशिवाय व्यवहारांत काय काय अडचणी निर्माण होतील यांचा विश्वासपूर्ण अंदाज करणें शक्य होणार नाहीं. "

---

## महाराष्ट्र भाषेची वाढ

भाषेची खरी वाढ होण्यास ती भाषा वापरणारांचा व्यवहार अधिक वाढला पाहिजे, आणि स्वभाषेंत आपले विचार लोकांस कळवून लोकांची प्रवृत्ति किंवा मनें फिरविण्याची जरूरही देशांतील पुढाऱ्यांस अधिकाधिक वाटूं लागली पाहिजे. असें जेव्हां होईल, जेव्हां विद्वान् लोक अनेक शास्त्रांचें स्वभाषेंत अध्ययन व अध्यापन करतील, जेव्हां सामाजिक, राजकीय, औद्योगिक आणि शास्त्रीय वाद किंवा चर्चा हरएक प्रसंगी व हरएक वेळीं स्वभाषेंत होऊं लागेल, जेव्हां धर्मजागृति किंवा सुधारणा करण्यास स्वभाषेचाच उपयोग करण्यांत येईल आणि जेव्हां दरबारांत, कचेरींत, बाजारांत, लष्करांत किंवा विद्यालयांत सर्व व्यवहार स्वभाषेनेंच चालेल तेव्हां स्वभाषेची खरी वाढ होणार! इंग्रजी राज्यांत या प्रसंगांपैकीं पुष्कळ प्रसंग कमी झाले आहेत. तेव्हां अर्थातच त्या मानानें भाषेच्या वाढीसही अडथळा येणारच. तथापि आमच्यापैकीं सुशिक्षित वर्गातील लोकांनीं औदासिन्य टाकून आपणांस मिळालेलें ज्ञान सामान्य जनास स्वभाषेच्याद्वारें शिकविणें हेंच आपलें कर्तव्य समजून त्याचप्रमाणें कळकळीनें उद्योग करण्यास आरंभ केला तर गेल्या ऐंशीं वर्षांत झाली आहे त्यापेक्षां मराठी भाषेची अभिवृद्धि अधिक होईल अशी आम्हांस खात्री आहे.

–लो. टिळक

( केसरी ता. १९ जून १९०६ )










प्रा. सरोजिनी शेंडे

# हरिश्चंद्र पुराण -- विष्णुदास नामा

सर्वसामान्य माणसाच्या धार्मिक भावनेला अधिष्ठान मिळवून देण्याच्या प्रेरणेनें मराठींतील वाङ्मयाची निर्मिती झाली. त्यामुळें संस्कृत वाङ्मयांतील तात्त्विक ग्रंथ, रामायण, महाभारत, भागवत व इतर आख्यानें मराठींत आणण्याचा उपक्रम सुरू झाला. अशा रीतीनें मराठींत महाभारताची रचना करणारा विष्णुदास नामा हा पहिला महाभारतकार होय. त्याच्या भारताच्या अठरा पर्वांतील फक्त स्वर्गारोहणपर्व व स्फुट काव्यांपैकीं तुळशीमहात्म्य हे दोनच ग्रंथ स्वतंत्ररीत्या प्रकाशित आहेत. बाकीचें बहुतेक काव्य अप्रकाशित व अज्ञात आहे. त्याच्या चरित्रविषयक व काव्यविषयक असलेली उपलब्ध माहिती फारच त्रोटक आहे. राजवाडे, य. खु. देशपांडे, वि. ल. भावे, ह. ना. नेने व डॉ. तुळपुळे यांनीं कांहीं प्रमाणांत माहिती दिलेली आढळते.

विष्णुदास नाम्याच्या अप्रकाशित काव्यांपैकींच ' हरिश्चंद्र पुराण ' हें एक होय. या काव्याचें हस्तलिखित तंजावर येथील ' सरस्वति महाल ' ग्रंथालयांतील आहे. एकंदर ओंवीसंख्या ८९७ आहे. राजवाड्यांनीं कऱ्हाडला पाहिलेल्या ग्रंथांत ११०० ओंव्या असल्याचें म्हटलें आहे. हें विष्णुदास-नाम्याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें प्रसंगांत विभागलेलें आहे. त्यांत चार प्रसंग आहेत. काव्य ओंवीबद्ध असून इतर ग्रंथांप्रमाणेंच यांतील ओंव्याहि बऱ्हंशीं अनियमित अक्षरांच्या साडेतीन चरणीं व क्वचित् साडेचार चरणीं आहेत.

## वैदिक वाङ्मयांतील उल्लेख : ऐतरेय ब्राह्मण

हरिश्चंद्राच्या सत्त्वपरीक्षेची अत्यंत उदात्त व हृदयस्पर्शी अशी ही कथा आहे. हरिश्चंद्रासंबंधींचे उल्लेख वैदिक वाङ्मयांत आढळतात; परंतु ती कथा फक्त त्याच्या पुत्रप्राप्तीसंबंधींची आहे. त्यामध्यें विश्वामित्रानें घेतलेल्या सत्त्वपरीक्षेचा नामनिर्देशहि नाहीं. उदा०

### ऐतरेय ब्राह्मण

ऐ० ब्राह्मणांत पुढील कथाभाग आढळतो. इक्ष्वाकु वंशांतील हरिश्चंद्राला अपत्य नव्हतें. नारद मुनीनें एकदां पुत्राचें महत्त्व सांगितलें. म्हणून राजानें पुत्रप्राप्तीसाठीं वरुणाची प्रार्थना केली व पुत्र जन्मतांच त्याला (वरुणाला) अर्पण करण्याचें वचन दिलें. परंतु पुत्र झाल्यावर प्रत्येक वेळीं कांहीं ना कांहीं कारण सांगून वचनाप्रमाणें वागला नाहीं. शेवटीं तो चिलखत घालण्याएवढा झाल्यावर राजानें रोहिताला ( पुत्राला ) आपला हेतु कळविला. तो ऐकून रोहित अरण्यांत निघून गेला व सहा वर्षें तिकडेच राहिला. शेवटीं एका गरीब ऋषीचा शुनःशेप नांवाचा पुत्र विकत घेऊन त्यानें वरुणाला अर्पण करण्यासाठीं आणला व आपणांला वचनमुक्त केलें. शुनःशेपानें यज्ञाच्या वेळीं वरुणाची करुणा भाकून आपणाला मुक्त करून घेतलें. एवढाच कथाभाग वैदिक वाङ्मयांत सांपडतो.

अनेक उपाख्यानांचा विस्तृत प्रपंच असलेल्या व्यासकृत महाभारतांत हरिश्चंद्राचा फक्त ओझरता उल्लेख आढळतो. सभापर्वांत स्वर्गांतून आलेला नारद

१ स्वर्गारोहणपर्व– विनायक दादोबा पुरंदरे आणि कं. कर्नाटक मुंबई शके १८१२
२ एकादशी महात्म्य– मुंबई; गो. रा. फणसळकर; देऱ्हारे छा. मुंबई शके १८१२
३ वि. का. राजवाडे– भा. इ. सं. मं. पुणें. शके १८३३, १८३७.
४ य. खु. देशपांडे– महानुभावीय वाङ्मय
५ वि. ल. भावे– महाराष्ट्र सारस्वत, भाग १, शके १८४६, पा० २४६ ते २५२.
६ ह. ना. नेने– महाराष्ट्र साहित्य पत्रिका
७ डॉ. तुळपुळे– महाराष्ट्र सारस्वत पुरवणी.
८ वि. का. राजवाडे– भा. इ. सं. मं. शके १८३७ पुणें.
९ सभापर्व-अ. १२ व १३. चित्रशाळा प्रेस ( मुंबई प्रत ) १९२९.








पांडवांना त्यांच्या पित्याचा निरोप असा सांगतो कीं, राजसूययज्ञ केल्यामुळें हरिश्चन्द्राला इंद्रसभेमध्यें फार मानाचें स्थान प्राप्त झालें आहे. तेव्हां तुम्हीहि राजसूययज्ञ करा; एवढाच उल्लेख त्यांत आलेला आहे.

**सांख्यायन श्रौतसूत्र**

सांख्यायन श्रौतसूत्रांतील[१०] हरिश्चंद्राची कथा ऐतरेय ब्राह्मणांतील कथेप्रमाणेंच आहे. इक्ष्वाकु वंशांतील हरिश्चंद्र राजाला शंभर राण्या होत्या. त्याला अपत्य नव्हतें. एकदां नारद व पर्वत ऋषि त्याच्याकडे आले असतां, राजानें त्यांना पुत्रप्राप्तीचें फल काय म्हणून विचारलें. तें त्यांनीं दहा पद्यांत सांगितलें ( स नारद एकयर्चा पृष्टो दशभिर्वक्ष्यमाणभिः प्रत्युवाच। ) त्याच्या आदेशानुसार राजानें वरुणाची प्रार्थना केली व त्याला यज्ञांत पुत्र अर्पण करण्याचें वचन दिलें. पुत्र झाल्यावर त्याचें नांव रोहित असें ठेविलें. ठरल्याप्रमाणें वरुण वचनाची आठवण करून देऊं लागला, त्यावेळीं निरनिराळ्या सबबी सांगून राजानें वेळ मारून नेली. शेवटीं यजन करण्याची पाळी आली त्यावेळीं पुत्रस्नेहानें व्याकुळ होऊन त्यानें रोहिताला आपला मनोदय कळविला. ( अयं भगवान्वरुणस्त्वा अनेन समयेनाददाद्यत्व या पशुना इमं यजा इति ) तें ऐकून रोहित अरण्यांत निघून गेला. वरुणाला हें कळल्यावर त्यानें राजाला जलोदर-व्याधीनें पीडा करण्यास सुरुवात केली. हें कळल्यावर रोहित पित्याकडे निघाला. त्यावेळीं इंद्रानें ब्राह्मणवेषानें येऊन त्याला परावृत्त केलें. असें सात वेळां घडलें. शेवटीं रोहिताला अजीगर्त सौयवसि भेटला. तो क्षुधेनें पिडल्यामुळें आपल्या एका मुलाला ( मधल्या ) शंभर गाई घेऊन विकावयास तयार झाला. त्याप्रमाणें त्याला घेऊन रोहित पित्याकडे गेला व वरुणाला हें वृत्त समजतांच क्षत्रियाऐवजीं ब्राह्मण वध्य म्हणून मिळाल्यानें संतुष्ट झाला. शुनःशेपानें वरुणाची प्रार्थना केली व जीवदान मिळविलें.

**मार्कण्डेय पुराणांतील कथाभाग**

हरिश्चंद्राची कथा मार्कंडेय पुराणांत[११] आहे. त्यामध्यें पुढील कथा भाग इतरांहून वेगळा आहे.

जैमिनींनें मार्कंडेयाला महाभारताविषयीं चार प्रश्न विचारले व महाभारत ऐकूनहि त्यांविषयीं आपली जिज्ञासा पुरी झाली नाहीं असें सांगितलें. तेव्हां मार्कंडेयांना तपश्चर्येला बसावयाचें असल्यामुळें त्यांनीं द्रोणांच्या चार पुत्रांना ( पक्षीरूप ) त्या शंका निवारण करावयास सांगितलें.[१२] त्यांतील चौथा प्रश्न असा होता— द्रौपदीचे पांच पुत्र अल्पायुषी व अविवाहित असतांनाच कां वारले ? या प्रश्नाचें उत्तर देतांना त्यांनीं हरिश्चंद्राची कथा सांगितली.

त्रेतायुगांत हरिश्चंद्र नांवाचा महापराक्रमी राजा होऊन गेला. एकदां तो मृगयेला गेला असतां, " आम्हांला वांचवा " अशी स्त्रियांची करुणवाणी त्यानें ऐकली. तेव्हां तें ऐकून त्यानें सावजाच्या मागचें धांवायचें सोडून, ' घाबरूं नका ! माझ्या राज्यांत असें विपरीत वर्तन करणारा कोण आहे ? ' असें म्हटलें. त्यावेळीं प्रत्येक कार्यांत अडथळा आणणारा रौद्र विघ्नराज त्याच्या अंगांत शिरला व त्यामुळें राजा म्हणाला, "माझ्या बाणांचें लक्ष्य बनून चिरनिद्रा घेण्यास कोण उत्सुक झाला आहे ?" राजाचे हे शब्द ऐकतांच विश्वामित्र संतापला व त्याबरोबर त्याची तपश्चर्या भंगली. त्याला राजानें वंदन केलें व म्हणाला, " मी माझें कर्तव्यच बजावीत आहे. धर्मशास्त्राप्रमाणें मी दान केलें पाहिजे व रक्षण केलें पाहिजे." तेव्हां विश्वामित्रानें सांगितलें "मी ब्राह्मण आहे. मला पृथ्वीचें चतुरंग सेनेचें व सर्व संपत्तीचें दान देऊन, राजसूय यज्ञाची दक्षिणा दे." हें ऐकून राजा संतुष्ट झाला व त्यानें तें दान दिलें. त्याबरोबर ऋषीनें त्याला राज्याबाहेर जाऊन दक्षिणा द्यावयास सांगितली. त्याप्रमाणें राजा, त्याची राणी शैब्या व मुलगा यांसह बनारसला गेला. तेथें गेल्यावर तत्काळ द्रव्य मिळविण्याचा कांहींच मार्ग न दिसल्यामुळें राणी व मुलगा यांना एका ब्राह्मणाला विकलें व स्वतःला कोणाला विकावें म्हणून विचार करीत असतां एक अत्यंत घृणास्पद चांडाळानें त्याला विकत घेण्याची तयारी दाखविली. राजा विचारांत पडला; परंतु विश्वामित्रानें चांडाळापासून पुष्कळ द्रव्य घेऊन त्याला विकलें. तेथें प्रेतावरील कर घेणें व आच्छादनाचें कापड गोळा करणें ही अत्यंत हलकीं कामें करीत असतां अतिश्रमा-

१० Ed. A. Hillebrandt 15/17 to 25. ( PP. 322 to 338 )
११ मार्कंडेय पुराण – अ० ७ व ८.
१२ मार्कंडेय पुराण – अ. १ : १-२०











मुळें त्याला झोंप लागली [१३] त्यावेळीं त्याला स्वप्नांत असें दिसलें कीं, गुरूची दक्षिणा देऊन तो मोकळा झाला होता. पुढें तो अत्यंत निकृष्ट पुक्कस जातींत जन्माला आला व त्यांच्याप्रमाणें स्मशानभूमींतील कामें करूं लागला. एकदां एका गरीब ब्राह्मणाच्या मृत शवाबद्दल पैसे देऊं शकेनात; त्यावेळीं त्यानें पैसे मागतांच त्यांनीं शाप दिला. त्यामुळें तो झोंपेंतच यमपुरी व तेथील यातना अनुभवूं लागला व तसा शंभर वर्षें तेथें होता. मग तो कुत्रा, गाढव, माकड, बैल, बकरा, मांजर, बगळा, पक्षी, किडा, पोपट, मैना, सायाळ, डुक्कर, साप व आणखी, अनेक प्राण्यांच्या रूपानें जन्मला. नंतर पुष्कळ वर्षांनीं तो राजघराण्यांत जन्मला व तेथें द्यूत खेळून त्यानें राज्य, घरदार व पत्नी सर्व कांहीं गमावलें; व अरण्यांत फिरत असतां त्यास सिंहानें खाल्लें. मग पुन्हां त्यानें आपण स्वर्गांत असल्याचें पाहिलें व राणी करुण स्वरानें रडत असतांना पाहिली. पुत्र मृत झाल्याचें पाहिलें. नंतर तो जागा झाला व त्याचें अंतःकरण दुःखानें भरून आलें. [१४] असेंच दिवस चालले असतां रोहित सर्पदंशानें मृत्यु पावला व राणी त्याला घेऊन स्मशानभूमीवर आली. तेथें त्यांची भेट होऊन सर्व चितेंत उडी घेणार, एवढ्यांत इंद्र व सर्व देव त्यांच्यावर प्रसन्न होऊन त्यांना वर देतात व तो सुखानें राज्य करतो.

### देवी भागवत

या वृत्तांतांतील हा स्वप्नाचा भाग इतर कथांत कोठेंहि सांपडत नाहीं. देवी-भागवतांतील [१५] कथेंत 'ऐतरेय ब्राह्मणां'तील हरिश्चंद्राला वरुण कृपेनें झालेली पुत्रप्राप्ती व पुत्राला वांचविण्यासाठीं शुनःशेपाला विकत घेतलें; व शेवटीं शुनःशेपानें केलेल्या प्रार्थनेमुळें तोहि वांचतो. पुढें हरिश्चंद्रानें राजसूय यज्ञ करून सर्व ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिली. म्हणून वसिष्ठांनीं त्याची स्तुति केली. ती ऐकून विश्वामित्र रागानें म्हणाला– [१६]

> एवं स्तौषि नृपं मिथ्यावादिनं कपटप्रियम् ।
> वञ्चितो वरुणो येन प्रतिश्रुत्य वरं पुनः ॥
> मम जन्मार्जितं पुण्यं तपसः पठितस्य च
> त्वदीयं वाऽतितपसो ग्लहं कुरु महामते ॥

विश्वामित्रानें शुनःशेपाला वांचविण्याचा प्रयत्न केला होता व त्याच्याच उपदेशानुसार वागून त्याला जीवदान मिळालें होतें. हें लक्षांत घेतलें कीं, विश्वामित्राचा राग समजूं शकतो. पुढें हरिश्चंद्राचें मृगयेला जाणें, सुंदर स्त्रीचें रुदन ऐकून तिच्या विनंतीनुसार विश्वामित्राला तपश्चर्या थांबविण्यास सांगणें, यांमुळें ऋषीनें रागावून एका महाभयंकर डुक्कराला हरिश्चंद्राच्या राज्यांत गोंधळ माजविण्यास पाठविणें, व राजानें त्याचा पाठलाग केला असतां राजाचें एका निर्जल स्थळी येणें; असा वृत्तांत आहे. तेथेंच त्याला विश्वामित्र ब्राह्मणरूपानें भेटला आणि त्यानें 'राज्यं देहि महाराज वराय स परिच्छदम्' अशी मागणी केली व 'हेमभारद्वयं सार्धं दक्षिणां देहि साम्प्रतम्' असें सांगितलें. राजा राजवाड्यांत जातो तोंच विश्वामित्र येऊन राज्य ताब्यांत घेतो व राजा, आणि राणी माधवी व राजपुत्र रोहित नगराबाहेर जातात. विश्वामित्रानें दक्षिणेसाठीं तगादा लावल्यामुळें राजा तिघांना विकतो. राणी व पुत्र यांना विश्वामित्र ब्राह्मणरूपानें विकत घेतो व राजाला वीरबाहू चांडाल विकत घेतो व स्मशानरक्षणाचें काम देतो. एकदां ब्राह्मणपुत्रांबरोबर फुलें आणण्यासाठीं गेलेला रोहित सर्पदंशानें मृत्यु पावतो. राणी विश्वामित्राच्या प्रेरणेनें पुत्राच्या प्रेताची विल्हेवाट लावण्यासाठीं थांबली असतां तोंच नगरपालकांकडे 'डाकिणी' आली असल्याची वार्ता पसरवितो व त्यांनीं दिलेल्या शिक्षेप्रमाणें वीरबाहू हरिश्चंद्राला तिचा शिरच्छेद करावयास सांगतो. राणी पुत्राच्या प्रेताची व्यवस्था करण्यासाठीं थोडा अवधि मागते. दोघांची ओळख पटते व राणी शैब्या (पूर्वी माधवी असा उल्लेख आला आहे – शिबी राजाची कन्या म्हणून शैब्या) व राजा पुत्राबरोबर चितेंत उडी घ्यायचें ठरवितात; व अम्बेचें स्मरण करतात. तोंच सर्व देव विमान घेऊन त्यांना देवलोकीं नेण्यासाठीं येतात. तेव्हां ज्यांची इच्छा होती त्या सर्व प्रजाजनांसह तो स्वर्गलोकीं जातो.

---

१३ मार्कंडेय पुराण – ८ : १२८
१४ मार्कंडेय पुराण– अ० ८ : १२८–१६८
१५ देवी भागवत–स्कंद ७ : अ० : १४ ते २७
१६ दे. भा–स्कंद ७. १७–५५,५६











याप्रमाणें या चार ग्रंथांतील चार कथा आहेत. त्यांत हरिश्चंद्र अपत्यहिन असतो व वरुणाच्या कृपेनें त्याला पुत्र होतो हा भाग विष्णुदास-नाम्याच्या हरिश्चंद्र पुराणांत नाहीं. त्यांत विश्वामित्रानें त्याची घेतलेली सत्त्वपरीक्षाच फक्त आहे. ती देवी भागवतांतील कथावस्तूशीं सदृश असली तरी त्यांत विष्णुदास नाम्यानें स्वतःच्या कल्पनाशक्तीचा विलास दाखविला आहे. निरनिराळ्या प्रसंगांतून हरिश्चंद्र, तारामती व रोहिदास यांच्या आचरणांतील एकवाक्यता दाखविली आहे. उदा० पाणपोईचें पाणी न पिण्याचा तिघांचा निर्धार; ऋण फेडण्याविषयीं उत्सुकता व खडतर प्रसंगांत दिसून येणारें तिघांचेंहि अतुलनीय धैर्य हें त्यांच्या कृतींतून व उद्गारांतून दाखवून काव्याची उदात्तता वाढविलीं आहे.

## हरिश्चंद्रपुराण

विष्णुदास नाम्याच्या इतर काव्याप्रमाणेंच या काव्याचा आरंभ गणेश व शारदा यांच्या स्तवनानें होत असून दोघांनींहि अनुकूल वर दिल्याचा तो उल्लेख करतो. नंतर हरिश्चंद्राचें ऐश्वर्य वर्णन करतो. एकदां नारद त्याच्याकडे आला असतां त्यानें अतिशय आदरानें व प्रेमानें त्याचें स्वागत केलें. " शोडश उपचारिं पूजा केली । म्हणे आजि वैष्णवेसि भेटि जाली । दृष्टि त्याची वोल्हावलि । रूप पाहाता ॥३५॥ नारदानें स्वर्गांत जाऊन इंद्रसभेंत राजाची स्तुति केली. ती ऐकून वसिष्ठ ऋषींना संतोष वाटला व विश्वामित्राला राग आला; व त्यानें राजाचें सत्त्व पाहाण्याची घोर प्रतिज्ञा केली. नंतर विश्वामित्रानें मोठा यज्ञ करून मातंगेश्वरीला प्रसन्न करून घेतलें.[१७] तिच्या वरानें खूप श्वापदें निर्माण करून हरिश्चंद्राच्या प्रजेला खूप त्रास देण्यास सुरुवात केली. वसिष्ठांनीं मृगयेला जाऊं नको म्हणून सांगितलें असतांहि, नाइलाजानें राजा श्वापदें मारण्यासाठीं अरण्यांत गेला. पुष्कळ सावजें मारून राजा परतत असतां, विश्वामित्रानें दोन हरणें पाठवून, राजाला मृगयेच्या मिशानें सिद्धाश्रमाला आणिलें. तेथें एका शिवालयांत राजानें पूजा केली. तों दोन सुंदर मातंगिनी गात होत्या. राजानें खूप होऊन त्यांना पारितोषिक देण्याची इच्छा दर्शवितांच त्या राजाशीं संभोग मागूं लागल्या. मग सत्यकीर्ति प्रधानानें त्यांना हांकून दिलें. त्या रडत विश्वामित्रापाशीं गेल्या. तेव्हां तो फार संतापला. मग राजा-राणीनें क्षमा मागितली. रात्रीं झोंपला असतां स्वप्नांत एका ब्राह्मणाला राज्यदान केल्याचें पाहिलें. जागा झाल्यावर विश्वामित्रानें त्यावर औटभार सोनें दक्षिणा मागितली. ती राजधानींत देण्याचें कबूल करून राजा राजधानींत गेला. भांडाऱ्याला बोलावून दक्षिणा देऊं लागतांच विश्वामित्र संतापला व ' माझेंच मला देतोस ' असें म्हणाला. मग राजा व राणी आणि त्यांचा पुत्र रोहित यांना प्रहार करून नागरिकांच्या विनंतीला न जुमानतां हांकून दिलें. रस्त्यांत त्यांच्यावर अनेक संकटें आणविलीं. तरीहि त्या तिघांनीं विहित आचरण सोडलें नाहीं. पुढील बहुतेक कथाभाग मागेंच सांगितलेल्या देवी भागवतांतील वृत्तांतासारखाच आहे.

## करुणरसाचा आविष्कार

ह्या काव्यांत करुणरसाचा आविष्कार कवीनें फार सुंदर रीतीनें केला आहे. कथानक करुणरसाला पोषक असल्यामुळें कवीनें अनेक हृदयस्पर्शी प्रसंग योजिलें आहेत.

( १ ) राजा, राणी व राजपुत्र राज्यत्याग करून बनारसला जात असतां तिघेंहि वणव्यांत ( विश्वामित्र निर्मित ) सांपडलीं. वणव्यांतून जात असतां त्यांची चुकामूक होते. उदा० वणव्याचें वर्णन पहा :

मग धावोनि गेला पुढा । वोनवा रचिला धडफुडा<br>
तेने झाडे जळत धडधडा । वोल वृक्ष ॥ ३-३१<br>
ऐसा वोनवा लागला वनासि । जाळा लागल्या आकासि<br>
वनि आट स्वापदासि । भोंवतुसे ॥ ३२ ।।<br>
ऐसा प्रज्ञ प्रजळला भोंवति । मग काये म्हणे ते तारामति<br>
पति पुत्र न दिसति । न दिसे वाट लक्षमिपती ॥ ३३<br>
वोनवा कवळितसे कैसा । अवघा धूर भरला घसा<br>
बापा रोहिदासा कैसा । वाचसिल ॥ ३४<br>
तव अदिक वोनवा झोंबे । आंगीं ज्वाळा झोंबति तावे<br>
तेव रोहिदासु गळा झोंबे । तारामतिचिया ॥ ३५

याप्रमाणें भयंकर वणव्यांत सांपडलीं असतांहि ' ब्राह्मणाचें ऋण फिटण्याच्या आंत मृत्यु येण्याची भीति राजाला प्रामुख्यानें वाटत होती. दोघांची चुकामूक होते व तारामति शोक करते. तेवढ्यांत विश्वामित्र ब्राह्मणरूपानें येऊन तिला दोन मायावी प्रेतें

[१७] विष्णुदास नामाकृत ह० पुराण - १-९२-१०५.



अनुक्रमणिका






दाखवितो. तिचा शोक अनावर होतो. मग,

मग म्हने कवनाचें णेनो दोन्हि। मृत्यु पावले बोनवियानि
जळोनि पडिले दोन्हि । ते म्या देखिले ॥ ३-५८
एक पुरुश एक बाळु । दोघावरुनि गेलासे जाळु ।
पैल दिसतसे माळु । तेथें पडिले आहेति ।। ५९

तीं प्रेतें पाहिल्यावर :

मग तयाते देखोनि वनि । तारामति आंग टाकि धरनि
राया मज वनिं । कां सांडिलें ॥ ३-६५
अगा सूर्य वंसिया नृपति । तुवा कटकाई केलि केउति
हे अवघि सत दिपावति । कवना निर्विलि ।। ६७
अगा सूभाळा चूडामनि । मज सांडिलें निरांजनि ।
कां गेलेति दोघे सांडोनि । आतां देह सांडिना ।।६८।।
कां गा मजसि जालासि उदासु । कां माझा घेतला त्रासु
आतां निढळे सुर्येवंसु । राहिला तुजविन ॥ ६९ ॥
कां रे बा रुसलासि मजसि । उसिर झाला अरोगनेसि।
आतां तुझाविन तुम्हासि । उठ वेगीं ॥ ७१ ॥
कोरे चित्त केले निकुष्ट । मीं वाडवेळ पाहातुसे वाट ।।
म्हनोनि मेळविले लल्हाट । कटकटा काये झाले ।। ७२ ।।

अशा प्रकारें विलाप करीत असतां ब्राह्मणरूपानें विश्वामित्र तिला आपल्या आश्रमांत बोलावितो; परंतु ती तेथेंच प्रेतांजवळ शोक करीत बसते; तोंच ऋषीच्या मायेनें अत्यंत क्रूर वाघ येऊन दोन्ही प्रेतें फाडतो. हें पाहून तारामतीचा प्राणच जाणार असें वाटून पुन्हां तिघांची भेट विश्वामित्र करवितो. हा सर्व कथाभाग वाचतांना नलदमयंती आख्यानांतील दमयंतीला नळ सोडून गेल्यानंतर तिच्यावर ओढवलेल्या संकटपरंपरे-सारखा वाटतो.

सर्पदंशानें रोहिदास मृत्यु पावतो त्यावेळचा तारामतीचा शोक असाच हृदयस्पर्शी आहे. त्याबरोबरच दुःखाच्या वेळीं तारामतीनें दाखविलेला विवेक ह्याच कवीच्या 'कमळाकर चरित्रां'तील अशाच प्रसंगाशीं सदृश आहे. ब्राह्मण उपाशी जायला नकोत म्हणून तिनें आपल्या पुत्राच्या मृत्यूचें दुःख बाजूला ठेवून 'येरि म्हने ब्राह्मने भुकेले जाति । म्हनोनि न संगेचि मि ॥ ६१ ॥ तये वेळे कौसिकु म्हने । हे श्रेष्ठ याचे करने ॥ वागते.

## करुण प्रसंगाचें उदात्तांत रूपांतर

अशा अनेक प्रकारच्या विपत्तींना धीरोदात्तपणें तोंड देऊन सर्वांवर कळस करणारा प्रसंग तारामतीवर कोसळला असतां करुण प्रसंगांचें उदात्तांत होणारें रूपांतर हृदयाला चटका लावणारें आहे. रोहिदासाच्या प्रेताची व्यवस्था लावण्यासाठीं ती स्मशानभूमीवर गेली असतां विश्वामित्रानें तिला देवळांत जाऊन थोडा वेळ थांबण्यास सांगितलें; व तिला झोंप लावून तिच्या मांडीवर पुत्राचें प्रेत फाडून ठेवलें व हाता-तोंडाला रक्त माखविलें आणि गांवांत जाऊन ग्रामपालकांना सांगितलें कीं, देवळांत एक लांव आली आहे. राजाला हें वृत्त कळवितांच त्यानें डोंबाला तिचा शिरच्छेद करविण्याचा हुकूम दिला व वीरबाहूनें हें काम हरिश्चंद्रावर सोपविलें. मृत्युपूर्वी तिनें परमेश्वराजवळ पुढील वर मागितला. त्यावरूनच अत्यंत करुणरसाचा परिपोष करणाऱ्या प्रसंगांत त्या धीरोदात्तांचें वर्तन परिणामकारक ठरतें. ती म्हणते,

हा हो हरिश्चंद्रासारिखा पति । हेचि असे मागत जन्मो जन्मि ॥ ७३
रोहिदाससारिखा कुमरू । हरिश्चंद्रासारिखा भ्रतारू
वसिष्ठासारिखा गुरू । व्हावा जन्मोजन्मि ॥ ७४
आमुच्या सुकृता । पवाड लावि विश्वामित्रु दाता
तो व्हावा मागता । जन्मोजन्मीं ॥ ७५

याशिवाय कांहीं भयानक, बीभत्स, रौद्र वर्णनेंहि आलेलीं आहेत.

## तामस यज्ञाचें वर्णन

हरिश्चंद्राला आपल्या जाळयांत पकडण्यासाठीं विश्वामित्र मातंगेश्वरीला प्रसन्न करण्यासाठीं एक यज्ञ करतो. निकृष्ट व हीन वासना पुरी करण्यासाठीं केलेला हा तामस यज्ञ होय. अथर्ववेदांतील अभिचारांचें साह्य घेऊन केलेल्या यज्ञाचें वर्णन कवि पुढील शब्दांत करतो —

मग पाहोनि स्थानभूमि । बैसले सिध आश्रमिं ।
तेथें अभिच्यारि कर्मि । प्रवर्तले ॥ १–९३
आकोरें छेडिलि योक्ते । रचिलि छडकोन तेथें
सावे रुत्विज उद्गातें । सासष्टि विप्रा ।। ९४
तव तेचि अथर्वनि । बैसले नग्न ( ग्न ? ) होउनि
आगि उटी घेउनि । सेंदुराचि ॥ ९५
रत्नानंद कनेराचिया माळा । घातलिया सति गळां ।
आनि लल्हाटि टिळा । रक्त चंदनाचा ॥ ९६
मग तिळाकुंथें अग्नि आव्हानिला । तो कुंडामाजि प्रतेष्ठिला ।








हाति सुला घेतला । रक्त चंदनाचा ॥ ९७
मग ते अवश्वरि । आर्चे देवता वागेश्वरी
तिचि सोडस उपचारि । पुजा केलि ॥ ९८
मग तिये जवळि । बैसका केलिये ताळि ।
भैरव झोटिंग क्षत्रपाळि । तेही आले तेथें ॥ ९९
तेथें उततिया द्राक्षि केळि । आनि नारेळि पोफळि ।
धुम्राचेनि मेळि । गगन झाकोळले ।। १००
तया कुंडाभोंवतें । चउसष्ट मंत्रें लाविलि वोते
तयाचेनि दृष्टि । उन्मत्तपनें .........
येक मदद्रवे भरुनि पात्रें । देवि आनंदोन येन मंत्रें
मंगळ यज्ञ पवित्रे । घालुनि पटसुचि ॥ १०२
तेथें वैस्वामैत्रु आपन । हातिं बांधलें अभिच्यारि काकन
येरे ते करिताति वहन । अकरा कोटि मिळोनि ॥१०३

ह्या वर्णनावरून शेंदूर लावलेले, कण्हेरीच्या माळा गळ्यांत घालून नग्न होऊन सहासष्ट ब्राह्मण अथर्ववेदांतील मंत्रांचें पठण करून मातंगेश्वरीला प्रसन्न करून घेत होते.

## वर्णनांतील वास्तवता

हरिश्चंद्राला डोंबानें विकत घेतल्यावर तो डोंबांच्या घरीं गेला. घराभोंवतालचें वर्णन डोंबाच्या व्यवसायाची योग्य कल्पना देणारें असेंच आहे—

तव चहुंकडे मास वाळत । द्रगंध ( दुर्गंध ) घानि तेथें
कोरडि करवडे तेथें । गनित नाहि ॥ ४-२२४
पाझर भोवतें पडिले । ते अरधे स्वानि वेढिले
घासगीध काउले । भोंवति आकासि ॥ २५
माझाचि कर्पट घानी । उभे राहो न सके ते स्थानि
भुमिवरि असुद्ध सांडोनि । ते वेळि ॥ २६
निर्धुत होतो चक्रवति । आंगी कांटाळे उठति
चालता अस्तिवरि पाये पडति । तयाचे ॥ २७

कावळे, गिधाडें व कुत्रीं यांनीं अर्धवट जळलेलीं प्रेतें ओढून खाल्ल्यामुळें, चरबी, रक्त, व मांस यांचा सडा पडलेला व जागोजागीं हाडें लागताहेत, दुर्गंधी सुटलेली आहे अशा किळसवाण्या ठिकाणीं हरिश्चंद्र डोंबाचा रासणाईत म्हणून जातो. संस्कृत वाङ्मयांत अनेक ठिकाणीं आलेल्या स्मशानवर्णनाची आठवण हें वर्णन वाचतांना होते.

हरिश्चंद्र पुराणांतील कथावस्तूमध्येंच विष्णुदासनाम्याच्या नेहमींच्या आवडत्या निसर्गवर्णनांना व युद्धवर्णनांना वाव नाहीं. तरीहि विश्वामित्रानें मुद्दाम निवडलेल्या सिद्धाश्रमाचें पहिल्या प्रसंगांतील वर्णन त्यांतल्यात्यांत इतरत्र दिसणाऱ्या वर्णनशैलीचें स्मरण करतें.

## विष्णुदास नाम्याचा काल

विष्णुदासनाम्याच्या कालनिर्णयासंबंधीं आतांपर्यंत शुकाख्यानांतील[१८] पुढील उल्लेख प्रमाण मानला जातो.

' मन्मथनाम संवत्सर पौष्यमासीं ।
सोमवार अमावास्येच्या दिवशीं
पूर्णता आली ग्रंथासी ।
श्रोते सावकाशीं परिसीजे ।। शुक० ३७१

ही अमावास्या १५१७ शके म्हणजे १५९५ सनांतील होती. यावरून विष्णुदासनामा हा नाथांचा समकालीन असावा असें राजवाडे यांनीं म्हटलें आहे; त्याच्या काव्यांतील पांपरा, वोळगणें, झळंबु, गजबजु, चांचरी वगैरे शब्दयोजनेमुळें भाषा नाथकालीन दिसते.[१९] परंतु नुकत्याच उपलब्ध झालेल्या 'हरिश्चंद्र पुराणा'च्या पोर्तुगीज भाषांतरावरून विष्णुदास नामा एकनाथांच्या पूर्वी होऊन गेला असावा, असें मानण्यास सबळ पुरावा मिळाला आहे. पाद्री फ्रान्सिस्क रॅाइझ या पोर्तुगीज गृहस्थानें मराठींतील अनेक चांगल्या काव्याचीं भाषांतरें केलीं आहेत. त्यांतच त्या हरिश्चंद्रपुराणाचें भाषांतर आहे. परंतु एकनाथाच्या कोणत्याच काव्याचें त्यानें भाषांतर केलें नाहीं किंवा त्यांचा नामनिर्देशहि नाहीं. त्यावरून विष्णुदास नामा हा एकनाथपूर्व असावा असें दिसतें.

हरिश्चंद्र पुराण व रोममधील ग्रंथसंग्रहालयांतील पाद्री फ्रांसिस्क रॅाइझ याचें पोर्तुगीजींतील भाषांतर हें टंकलिखित ४६ सबंध fullscap कागद आहे. प्रा. प्रियोळकरांबरोबर दोन्ही ताडून पाहतां पोर्तुगीज भाषांतर पुष्कळसें शब्दशः आहे असें दिसून येतें. भाषांतरकर्त्यानें कांहीं ओंव्यांतील केलेल्या चुकाहि भाषांतर शब्दशः असल्याची साक्ष देतात उदा०

(१) ते वेळे वचिष्ट महामुनि ।
तो सुर्येवौशा अभिमानि ।

१८ वि. का. राजवाडे— भा. इ. सं. मं. अहवाल पृ. १२२, शके १८३३
१९ गो. का. चांदोरकर— भा. इ. सं. मं. पृ. १७८, शके १८३४.








झडकरि आला टाकुनि । अयोध्येसि ॥ १-६२॥
ह्यांतील ' अभिमानि ' हा शब्द ' अभिमन्यू ' असें समजून पुढील प्रमाणें भाषांतर केलें आहे. "सूर्यवंशी अभिमन्यूचा गुरु वसिष्ठ अयोध्येला गेला."

(२) हरिश्चंद्राला विश्वामित्राच्या ऋणांतून मुक्त करण्यासाठीं प्रजाजन आपली संपत्ति देऊं इच्छितात तेव्हां राजा म्हणतो.

तव म्हने चक्रवर्ति । जे राजे प्रजाचे द्रव्ये घेति ।
ते आपुले हातपाये खाति । उदरालागिं ॥२-११३

ह्या ओंवीचें भाषांतर -- " हरिश्चंद्र म्हणतो पूर्वी कांहीं राजे इतके दुष्ट होतें कीं, ते आपल्या प्रजेचे हातपाय खात होते. "

कांहीं किरकोळ फरकांखेरीज बाकी सर्वत्र जसेंच्या तसें भाषांतर आहे.

ह्या भाषांतरामुळें कवीच्या कालनिर्णयाला मदत होते. १५६० सालीं गोव्यामध्यें स्थापन झालेल्या ' इंक्विझिशनच्या ' कायद्याप्रमाणें हिंदुधर्माचेच नव्हे तर कॅथॉलिक पंथाखेरीज इतर ख्रिस्ती पंथांचेहि धर्मग्रंथ जवळ असणें हा गुन्हा होता. जे आक्षिप्त ग्रंथ जवळ बाळगतात व वाचतात अशांविरुद्ध (Contra os que tem e lem livros defesos ) खटले भरावें असें नमूद केलें आहे. मराठी संशोधन पत्रिका, वर्ष २ अंक ४, जुलै १९५५, पृ. ५ Regimento de Inquisic, ao, यावरून १५६० नंतर नवा हिंदुग्रंथ गोव्यांत येणें शक्य नव्हतें. म्हणजे सुरवातीला नमूद केलेल्या पुराव्यानुसार दिलेल्या १५९५ इ. स. या सनाच्या पुष्कळच मागें जावें लागतें. कारण एकादा ग्रंथ लिहून रसिक वर्गांत मान्य व्हावयास कांहीं कालावधि लागतो. त्या अर्थी हा कवि सोळाव्या शतकाच्या अगदीं आरंभींचा असावा असें म्हणण्यास प्रत्यवाय नसावा. त्या काळीं हा कवि लोकप्रियहि असावा, असें त्याच्या महाभारताच्या पर्वांचीं व इतर काव्यांचीं अनेक ठिकाणीं सांपडणारीं हस्तलिखितें पाहून वाटतें.

प्रस्तुत काव्याचा प्रसार तत्कालीन महाराष्ट्रांत बराच असावा, असें मुक्तेश्वराच्या स्फुटकाव्यें (महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत स्फुटवाक्यें-संपा० ओक व भिडे. १९०६ ) या ग्रंथांतील ' हरिश्चंद्राख्यान ' व श्रीधराचें पांडवप्रतापांतील 'हरिश्चंद्राख्यान' हीं काव्यें वाचून स्पष्ट निदर्शनास येतें. कारण, सुरुवातीपासून अखेरपर्यंतचें कथानक विलक्षण सारखेंच आहे. अगदीं बारीकसारीक तपशीलहि एकच आहे. उदा० विष्णुदास नाम्याच्या हरिश्चंद्र पुराणांतील पहिला प्रसंग घेतला व मुक्तेश्वराच्या हरिश्चंद्राख्यानांतील पहिला अध्याय तपासून पाहिला तर त्यांतील घटना पुढीलप्रमाणें आहेत.

गणेश व शारदावंदन– वर– हरिश्चंद्राची महती– नारदमुनीचा हरिश्चंद्रानें केलेला आदरसत्कार-नारदानें इंद्रभुवनांत केलेली हरिश्चंद्राची स्तुति-विश्वामित्राचा कोप व वसिष्ठाला झालेला आनंद–घोर प्रतिज्ञा-तपश्चर्येला जातांना वसिष्ठ अयोध्येला जातो–विश्वामित्रानें पाठविलेले हेर-राजा-राणीला केलेला उपदेश-विश्वामित्रानें केलेला आसुरी यज्ञ-देवतेकडून मिळविलेला वर-तदनुसार झालेली श्वापदांची उत्पत्ति-श्वापदांच्या संहारार्थ हरिश्चंद्राचें गमन–हरिश्चंद्राला सिद्धाश्रमाकडे आणविण्यासाठीं पाठविलेल्या दोन हरिणी–निसर्गसुंदर आश्रम–सरोवरांत स्नान व शिवालयांतील पूजा–

हा सर्व कथाभाग तिन्ही ठिकाणीं सारखाच आहे. ही गोष्ट उल्लेखनीय वाटतें.

प्रा. मो. स. गोसावी

# भारतांतील पशु-संपत्ति

## आपलें गो-धन : राष्ट्राची संपत्ति

सर्व जगांतील गाई-म्हशी यांची शिरगणती केल्यास ८० कोटीवर ती भरेल. परन्तु सर्व ठिकाणीं ( देशांत ) सारख्या प्रमाणांत त्यांची विभागणी झालेली नाहीं. जगांतील २५ टक्के गाई-म्हशी एकट्या भारतांतच आढळून येतील. भारतासारख्या कृषिप्रधान देशांत त्यांना, त्यामुळें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. वीस हजार वर्षांपूर्वी अगदीं सुरुवातीस निॲालथीक माणसें सुधारण्यासाठीं प्रयत्न करीत असतांना त्यांना गाई-म्हशी खेरीज इतर जवळचे असे कोणी नव्हते. बाबिलोन संस्कृतींत व इजिप्तमध्यें, इ. स. पूर्वी ३५०० वर्षे, जनावरें पाळण्याची हौस त्यावेळच्या मानवांत होती असा उल्लेख सांपडतो. युरोपांत पाळले जाणारे सुरुवातीचे प्राणी हे शरीरानें आखूड, उंचीनें कमी, धष्टपुष्ट व लहान शिंगाचे होते. भारतांत अगदीं सुरुवातीस टोळी टोळीनें राहणारे लोकहि अन्नधान्याचा अमोल ठेवा म्हणून जनावरे पाळीत असल्याचें दिसतें. गो-माता म्हणून गाईची पूजा करणारे भारतीय पूर्वीपासून आढळतात. जिवन्त असेपर्यंत दूध-दुभतें, व श्रमाचीं कामें करावयास मदत व मेल्यावर कातडीं, चामडीं, शिंगें यांचाहि उपयोग होत असल्यानें गाई-म्हशी हें शेतकऱ्याचे खरेखुरे जीवन व राष्ट्राची आर्थिक संपत्तीच आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

शेंकडा ८० टक्के लोक ज्या देशांत शेतीवर आपली गुजराण करतात, त्या सर्व जगाच्या पाठीवरील जास्तींत जास्त लोक पोसणाऱ्या, भारतांत प्रत्येक १०० एकर सुपीक जमीनीवर गाई-म्हशींचें असणारें प्रमाण ६७ असल्याचें आढळतें. हेंच प्रमाण जपानमध्यें ६, चीनमध्यें १५, इजिप्तमध्यें २५, इतकें आहे. तथापि, भारतांतील १० टक्के गाई-म्हशी निरुपयोगी व प्रजोत्पादनास असमर्थ अशा असतात. शिरगणतीच्या अहवालाप्रमाणें ३ वर्षे वयाच्या एकूण ५ कोटी गाईमध्यें, प्रत्येक दुभत्या गाईमागें २ कोरड्या गाई, असल्याचें आढळून आलें आहे. आपलें गो-धन खरोखरीच राष्ट्राची आर्थिक संपत्ति आहे असें म्हटलें तर त्याचे संवर्धन व संरक्षण होण्यास प्रयत्न करणें आवश्यक आहे.

## आजची परिस्थिति

भारतांतहि सर्व ठिकाणीं गाई-म्हशींचें प्रमाण संख्येनें व गुणानें भिन्न असलें तरी अगदीं उत्तम पगड जातीपासून अगदीं निकृष्ट दर्जाच्या जनावरांपर्यंत सर्व तऱ्हा येथें पहावयास मिळतात. फ्रान्समधील चारोलाय, हॉलंडमधील हॉलस्टेन, इंग्लंडांतील शॉर्टहॉर्न, व अमेरिकेंतील जेर्सी या जगांतील उत्कृष्ट जाती होत. भारताच्या दृष्टीनें विचार केल्यास दूध देण्यास उत्कृष्ट म्हणून पंजाबांतील साहिवाल व मुऱ्हा म्हैस, काठेवाडांतील गिर गाय व जाफराबादी म्हैस, व शेतीच्या कामास उत्कृष्ट म्हणून पंजाबांतील हिसार व हंसी, मद्रासमधील नेलोर, व गुजराथमधील कांकरेज यांचा उल्लेख केला जातो.

भारतांतील गाई-म्हशींची आजची परिस्थिति डकहॅम या लेखकाच्या शब्दांत एकाच वाक्यांत सांगतां येईल. ते म्हणतात. " The Cattle population in India is the largest, the most dense per acre of cultivated area and per person and probably one of the least efficient in the world " हिंदी लोकसंख्येप्रमाणेंच गाई-म्हशींच्या संख्येचा प्रश्न, उपलब्ध असलेल्या खुराकाचा प्रश्न, व उत्कृष्ट निपज करण्याचे मार्ग अशा अनेक समस्यांवर विविध समित्यांनी ऊहापोह करून आपले अहवाल सादर केलेले आहेत.

वैरणीचा योग्य पुरवठा नसल्यानें व खुराकहि वेळेवर न मिळाल्यानें आपल्या गाई-म्हशींची उपासमार होते. पावसाळ्याचे दिवसांत त्यांना ओली हिरवळ दिसते, पण एरवीं वाळलेलें गवत खाऊनच पोट भरावें लागते. अगदीं निरुपयोगी व उत्पादनास असमर्थ अशा जनावरांना नाहींसें करण्यास आपल्या धार्मिक भावना आड येतात; त्यामुळें त्यांचा आपणांस तर उपयोग होत नाहींच, पण त्या इतरांना मात्र खाण्यास काळ होऊन बसतात व अशाप्रकारें इतर चांगल्या जनावरांस उपलब्ध होणारे खाद्य त्यांना मिळू देत नाहींत. गाई-म्हशींच्या कार्यक्षमतेवर हवामानाचा परिणाम तर होतोंच, पण त्याशिवाय संसर्गजन्य रोगांचा त्यांच्यावर झपाट्यानें प्रसार होतो. रींडर-पेस्ट, ब्लॅक क्वॉर्टर, ॲन्थ्रेक्स,



अनुक्रमणिका

टयुबरक्युलॅसिस, सेप्टिकामीया या सारखे भयंकर रोग त्यांना होतात व त्यामुळें दुधाच्या उत्पादनांवर परिणाम होतोच पण त्यांच्या शरीराची नासाडी होते व वार्षिक जवळ जवळ २० कोटी रुपयांचें नुकसान होतें. दरवर्षी जवळजवळ ४ लाख जनावरें तोंडाच्या व पायाच्या रोगानें दगावतात व राष्ट्राची २॥ कोटी रुपयांची हानी होते. या सर्वांचा विचार करुन त्यावर उपाययोजना होणें अत्यंत जरूर आहे.

## राष्ट्रीय उत्पन्नांत पडणारी भर

असें जरी असलें तरी आजच्या या अशा परिस्थितींतहि त्यांच्यापासून राष्ट्रीय उत्पन्नांत चांगलीच भर पडत आहे. हें खालील आंकडेवारीवरुन कळून येईलः–

| | किंमत कोट रु. |
|---|---|
| १. दूध व दुभत्याचे पदार्थ– | ८०० |
| २. शेतीस मदत. नांगरणें वगैरे. | १२०० |
| ३. तयार झालेला माल वहाण्यास होणारी मदत. | ३०० |
| ४. मांस वगैरे. | १२० |
| ५. मृत्यूनंतर हाडें, कातडीं वगैरे. | ५० |
| ६. खत. | १००० |
| | कोटी रु. ३४७० |

भारतांस लोखंडी कारखान्यापासून ५० कोटी रुपये, कापडाच्या गिरण्यापासून १५० कोटी रुपये तर रेल्वे कंपनीपासून २८० कोटी रु. उत्पन्न मिळतें; पण एकट्या गाई-म्हशीपासून मिळणाऱ्या या उत्पन्नाचे ३४७० कोटी रु. लक्षांत घेतले म्हणजे एकूण राष्ट्रीय उत्पन्नास जवळ जवळ ४० टक्के हातभार त्या लावतात हें कळून येतें व त्यांचें महत्त्व जास्तच स्पष्ट होतें.

## व्यक्तीचा फायदा व राष्ट्रास संपत्ति

पुष्कळ वेळां असें म्हटलें जातें कीं, गाई-म्हशींची उत्तम निगा राखण्यास पुरेसा पैसा खर्च केला तर, त्यापासून फारसा विशेष फायदा होत नाहीं. परन्तु हें खरें नाहीं. कारण एखाद्या गाईचें सर्वसाधारण १५ वर्ष आयुष्य कल्पिलें तर तिच्या आयुष्याचा ताळेबंद पुढील प्रमाणें मांडतां येईल. गाईचें १५ वर्ष आयुष्य हें, पहिले ५० महिने लहानपणाचें, ६० महिने दूध देण्याचें, ३० महिने दूध नसण्याचें, व ४० महिने म्हातारपणाचें म्हणून सांगतां येईल. अशाचप्रकारें एखाद्या बैलाच्या जोडीचें १५ वर्ष आयुष्य कल्पून त्यापासून होणाऱ्या निव्वळ उत्पन्नाचा ताळेबंद तयार

---

१ ताळेबंद

एका गाईचा १५ वर्ष आयुष्याचा ताळेबंद

(१) गाई पासून होणारी अपेक्षित मिळकत.

| | |
|---|---|
| (अ) १८,००० पौंड दूध ... ... | रु. ८००० |
| (ब) ४ कालवडी, प्रत्येकी किंमत रु ५० | रु. २०० |
| (क) खत ( सरासरी दर दिवशीं १२ पौंड ) | रु. ३०० |
| (ड) हाडें, चामडीं वगैरे. ... ... | रु. ६० |
| | रु. ८५६० |

(२) गाईवर करावा लागणारा जास्तीत जास्त खर्च

| | |
|---|---|
| (अ) खुराक. | |
| (१) जन्मापासून वयांत येईपर्यंत ... | रु. ८०० |
| (२) दुभती असण्याच्या काळांत ... | रु. ४४०० |
| (३) दुभती नसण्याच्या काळांत ... | रु. १३०० |
| (४) उतारवयांत ... ... ... | रु. १२०० |
| (ब) इतर खर्च, ( गुंतवलेल्या मुद्दलावरील व्याज वगैरे ) | रु. १०० |
| | रु. ७८०० |

( ३ ) ठोक फायदा साधारण ( ८५६० – ७८०० ) = ७६० रुपये यांतून इतर विशेष मशागतखर्च जरी बाजूस धरला तरी ५०० ते ६०० रु. निव्वळ फायदा राहतो.










करतां येतो.[२] येथें दिलेल्या या दोन ताळेबंदावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, गाईवर किंवा बैलावर मूळ खर्चलेलें भांडवल लक्षांत घेऊनहि जवळ जवळ ५०० ते ६०० रु. नफा - निव्वळ फायदा - होतो. तेव्हां गाई-म्हशींची पैदास उत्तम करून त्यांची योग्य जोपासना व निपज केल्यानें व्यक्तीचा व पर्यायानें राष्ट्राचा किती फायदा होईल हें सांगावयास नकोच.

## दुधाचें उत्पादन कमी

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं, आपल्याकडे गाई-म्हशींची संख्या जास्त असली तरी एकूण दुधाचें उत्पादन हें सगळ्या इतर देशांतील दुधाच्या उत्पादनाशीं तुलना करतां बरेंच कमी असल्याचें आढळून येतें. तुलनाच करावयाची झाल्यास खालील आंकडे पहा.

प्रत्येक गाईपासून मिळणाऱ्या वार्षिक दुधाचें प्रमाण :—

| | |
|---|---|
| हॉलंड – | ७८०० पौंड |
| डेन्मार्क – | ७००० ,, |
| जपान – | ५८०० ,, |
| इंग्लंड – | ५५०० ,, |
| ऑस्ट्रेलिया – | १२०० ,, |
| इजिप्त – | २६०० ,, |
| भारत – | ७५६ ,, |

गाई-म्हशींना योग्य खुराक देऊन, त्यांची चांगली जोपासना केली तर आजच्या मितीस ६० टक्के दुधाच्या उत्पादनांत भर पडेल व त्यांच्या शारीरिक श्रमांत २५ टक्के वाढ होईल असें अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. आज भारतांत प्रत्येक व्यक्तीस दिवसास मिळणारें दूध ५ औंसापेक्षांहि कमी आहे. आरोग्याच्या दृष्टीनें तज्ज्ञांच्या मतें प्रत्येक व्यक्तीस १६ औंस दुधाची दररोज जरुरी असते. आरोग्यशास्त्रज्ञ तर असें म्हणतात कीं, लहान मुलांना दरदिवशीं ३॥ कप, गरोदर बायकांना ४ कप, बाळंतिणींना ६ कप व इतरांना २॥ कप दुधाची भारतांत जरुरी आहे. आपल्याकडे गाई-म्हशींची एवढी गर्दी झाली असतांना आपल्या समाजाची ही गरज त्या भागवूं शकत नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

## वाजवीपेक्षां जास्त गुरें नाहींत

ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे कांहीं कांहीं अर्थशास्त्रज्ञ भारतांत वाजवीपेक्षां जास्त गुरें आहेत असें म्हणतात त्यांत कितपत तथ्य आहे हें कळून येतें.

बैल व खोंड यांचा उपयोग प्रजोत्पादनास, जमीन नांगरण्यास, मोटा ओढण्यास, माल वाहण्यास किंवा घाण्यास जुंपण्यास होऊं शकतो. आपल्या देशांत चाललेली लहान प्रमाणावर शेती पाहिल्यास असलेले बैल व खोंड हे पुरेसे आहेत असें म्हटल्यास चालेल.

२ ताळेबंद—

**एका बैलाच्या जोडीचा १५ वर्षांच्या आयुष्याचा ताळेबंद.**

१. बैलाच्या जोडीच्या श्रमाची वार्षिक किंमत.

| | |
|---|---|
| ( अ ) १० एकर जमिनीवर शेतीसाठीं | रु. ५०० |
| ( ब ) वहातुकीचें साधन म्हणून | रु. ५० |
| | रु. ५५० |

२. अशाप्रकारें १५ वर्षांची त्याच्या श्रमाची किंमत.

| | |
|---|---|
| ५५० X १५ = | ८२५० रु. |
| खत ... ... ... | ३०० रु. |
| हाडें, चामडीं वगैरे | १२० रु. |
| एकूण मिळकत | ८६७० रु. |

३. खुराकाचा खर्च : १५ वर्षे. (५२०X१५) ७८०० रु.
मुद्दलावरील व्याज व इतर खर्च १०० ,,
७९००

४. ठोक फायदा. ( ८६७०–७९०० ) = ७७० रुपये. यांतून इतर विशेष खर्च जरी वजा टाकला तरी ५०० ते ६०० रुपये निव्वळ फायदा राहतो.











आज उपलब्ध असलेली जमीन नांगरण्यास व शेतीस मदत करण्यास लागणारे ६ कोटी कामकरी बैल आपल्या जवळ आहेत हें खरें; तथापि त्यांचीहि शारीरिक दुर्बलता घालविण्यास प्रयत्न करणें इष्ट आहे.

आज भारतांत ४० कोटी लोक आहेत. यांपैकीं किती लोकांना पायांत घालण्यास चपला मिळतात ? घटकाभर असें समजलें कीं, उपलब्ध होणारें सारें चामडें हें निव्वळ चपला बनविण्यासच उपयोगी आणलें तर त्यापासून फक्त १५ कोटी चपलांचे जोड तयार होतील. आपली चपला वापरणारी लोकसंख्या लक्षांत घेतां प्रत्येक ७ व्यक्तीगणित ३ जोड वाटणीस येतात. अमेरिकेंत किंवा इंग्लंडांत प्रत्येक व्यक्तीस दर वर्षास दोन जोड वाटणीस येऊं शकतात. आपली गाई-म्हशींचीं गर्दी लक्षांत घेऊनहि आपले प्रश्न किती गंभीर स्वरूपाचे आहेत हे यावरून ध्यानांत येईल.

आणखी एक गोष्ट लक्षांत घ्यावी. ती म्हणजे गाईपासून उपलब्ध होणाऱ्या शेणांचा उपयोग आज सर्रास 'गोवऱ्यां'कडे केला जातो. या शेणांत नायट्रोजन, पोटॅश यासारखीं उत्कृष्ट द्रव्यें असल्यानें त्यांचा जळणाकडे उपयोग न करतां खत म्हणून उपयोग केल्यास आज आपणांस भासणारी १० कोटी टन खताची जरूर सहज दूर होण्यासारखी आहे. शेणाच्या खतानें धान्याच्या वाढीस कृत्रिम खतापेक्षां जास्त जोर येतो. हें नव्यानें सांगण्यास नकोच.

यावरून भारतांत पशुसंवर्धन अधिक प्रमाणांत होण्यास वाव आहे, नव्हे त्याची जरूरी आहे हें दिसून येईल.

## पंचवार्षिक योजना व पशुसंवर्धन

पहिल्या पंचवार्षिक योजनेंत पशुसंवर्धनासाठीं १०० कोटी रुपयाची तरतूद केली होती. दुसऱ्या योजनेंत पशुसंवर्धनासाठीं ४० कोटी रुपये व डेअरी व्यवसायासाठीं २२ कोटी रु. देण्यांत आले आहेत. राज्य सरकारांनीं तयार केलेल्या पशुधन विकासाच्या योजनेंत गुरांच्या औषधोपचार व्यवस्थेंत वाढ करण्याच्या, केंद्रस्वरूप ग्रामस्थापनेच्या, बुळकांडी व इतर रोगांच्या उच्चाटनाच्या, गोसदनें व गोशाळांच्या विस्ताराच्या योजनांचा अंतर्भाव केला आहे. पशुवैद्यक शिक्षणाच्या सोयींत वाढ करणें आणि पशुसंवर्धन कार्यक्रमाची कारभारयंत्रणा बळकट करणें यासाठींहि योजनेंत तरतूद करण्यांत आली आहे. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत गुरांच्या दवाखान्याची संख्या २,००० वरून २६५० वर गेली. दुसऱ्या योजनेंत गुरांचे आणखी १९०० दवाखानें उघडण्यांत येतील असा अंदाज आहे.

एकंदर मृत्युपैकीं एकट्या बुळकांडी रोगामुळें ६० टक्के गुरें दगावतात, हें लक्षांत आल्यानें पहिल्या योजनेंत बुळकांडी रोगाच्या उच्चाटनाची एक प्रायोगिक योजना कार्यान्वित करण्यांत आली. त्या योजनेंतील अनुभवावरून आतां दुसऱ्या योजनेच्या काळांत देशांतून या रोगाचें समूळ निर्मूलन करण्याचा कार्यक्रम तयार करण्यांत आला आहे. पशु सुधारणा-कार्य मुख्यतः केंद्रस्वरूप ग्रामस्थापनेच्या योजनेद्वारें हातीं घेण्यांत आलें आहे. या योजनेंत पशुपैदाशीवर भर देण्यांत आलेला आहे. ग्रामकेंद्रांतून पैदाशींचीं केंद्रें चालविण्यांत आलेलीं आहेत. प्रत्येक केंद्रात ५००० गाईंची कृत्रिम रीत्या गर्भधारणा करण्याची व्यवस्था असते. पहिल्या-योजनेंत ६०० गांवें ग्रामकेंद्रें ठरविण्यांत आलीं व कृत्रिम रीत्या गुरांची पैदास करण्याची १५० केंद्रें स्थापन करण्यांत आलीं. दुसऱ्या योजनेंत या लक्ष्यांत दुप्पटीनें वाढ करून अनुक्रमें १२०० ग्रामकेंद्रें व ३०० कृत्रिम पैदाशींची केंद्रें स्थापन करण्यांत येतील. या ग्रामकेंद्रांतून ३००० अस्सल जातीच्या वळूंची, ९,३६००० चांगल्या बैलांची व १०,००० गायींची पैदास केली जाईल असा अंदाज आहे.

दुधाच्या उत्पादनांत वाढ करणें व गुरांच्या दूध देण्याच्या प्रमाणांत सुधारणा करणें या कामीं शहरांना दुधाचा पुरवठा करणारी कार्यक्षम संघटना महत्त्वाची कामगिरी बजावूं शकेल. या गोष्टीवर दुसऱ्या योजनेंत भर देण्यांत आला आहे. त्या दृष्टीनें ३० दूध पुरवठा संघटना, क्रीम काढण्याचे १० सहकारी कारखाने व दूध निर्जल करणारे ९ कारखाने स्थापन करण्याचा विचार आहे. या शेवटच्या कारखान्यांतून लोणी, तूप व मलई काढून घेतलेली दुधाची भुकटी यांचे उत्पादन करण्यांत येईल. मुंबईतील आरे दुधवाडीच्या धर्तीवर












जेथें आवश्यक असेल तेथें दूधवाड्या काढल्या पाहिजेत. या गोष्टीबरोबरच ग्रामीण भागांत दूध उत्पादकांच्या सहकारी संस्था काढल्यास त्यापासून बहुमोल फायदा मिळूं शकेल यांत संशय नाहीं.

## बहुमोल ठेवा जतन कसा करावा ?

अशाप्रकारें पंचवार्षिक योजनेंत पशु-संवर्धनाचे बरेच प्रश्न सोडविण्याचा विचार केलेला आहे. उत्तरप्रदेशांत सरकारनें याबाबत केलेले प्रयत्न व त्यांना आलेलें यश वाखणण्यासारखें आहे. भारतांतील पशुसंपत्ति हा बहुमोल ठेवा आहे. व त्याचें संरक्षण करणें अत्यंत अगत्याचें आहे. त्या दृष्टीनें कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्यास हव्यांत.

प्रथमतः जनावरांस लागणारें खाद्य कसें उपलब्ध करावें, असलेल्या जमिनींतून जास्तींत जास्त गवत कसें निर्माण करावें, सत्त्वयुक्त खाद्य कसें पुरवावें याचें भारतीय शेतकऱ्यास ज्ञान करून देण्यास हवें; दुसरें असें कीं, पशु-संवर्धन उत्तम होण्यासाठीं निरनिराळ्या हवामानांत त्यांना वेगवेगळ्या ठिकाणीं हलविणें, प्रजोत्पादनास उत्कृष्ट बैलांचाच वापर करणें, व इतरांना खच्ची करणें इष्ट आहे. व तिसरें असें कीं, गुरांना होणाऱ्या निरनिराळ्या रोगांवर प्रतिबंधक औषधें व उपाययोजना त्वरित करण्यास हवी. भारत-शेती-संशोधन मंडळाचे याबाबत प्रयत्न चालूच आहेत. याशिवाय भारतांतील निरनिराळ्या ठिकाणीं वर्षांतून कांही ठराविक वेळीं पशूंचें प्रदर्शन भरविण्यांत यावें. त्यामुळें शेतकऱ्यांत थोडी चुरस निर्माण होऊन गुरांची निपज चांगली होण्यास मदत होते.

आपली पशुसंपत्ति ही आपलें जीवनसर्वस्व आहे अशी भूमिका घेऊन, त्यांचें संवर्धन व संरक्षण उत्कृष्ट करण्यासाठीं, भारतांतील सर्व शेतकऱ्यांनीं जातीनें लक्ष पुरवून, सरकारशीं सहकार्य करावें व त्यायोगें वैयक्तिक फायदा व राष्ट्राची संपत्ति वाढविण्यास हातभार लावावा, एवढें सांगितलें म्हणजे पुरें.

---

## संस्कृत, इंग्लिश व देशी भाषा

इंग्रजीचें ज्ञान ज्या कारणामुळें आवश्यक अगर अपरिहार्य आहे त्या कारणानें नाहीं तरी अन्य कारणानें संस्कृतादि जुन्या भाषांचें ज्ञानहि देशी भाषांच्या उत्कर्षास आवश्यक आहे असें थोड्या विचारांनीं कळून येईल. गेल्या पांच-पंचवीस वर्षांत देशी भाषांतून जे चांगले ग्रंथ झाले आहेत ते वाचले असतां संस्कृतादि जुन्या भाषांतील शब्दांचा त्यांत किती भरणा असतो, व नवे नवे विचार देशी भाषेंत व्यक्त करण्यास या जुन्या भाषांची किती मदत होते हें कोणासहि उघड दिसून येईल. कोणत्याहि भाषेंत चांगली ग्रंथरचना होण्यास ( १ ) शब्दसामग्री, ( २ ) विचारसंग्रह आणि ( ३ ) ग्रंथांची जरुरी या तीन्ही साहित्यांची अपेक्षा असते. पैकीं पहिलें साधन बहुतेक अंशीं आमच्या देशांतील जुन्या भाषांच्या अभ्यासानेंच प्राप्त होणार आहे. विचारांचा मोठा सांठा बऱ्याच अंशीं पाश्चिमात्य ग्रंथकारांकडून आपणांस उसना घेतला पाहिजे. पण हे उसने विचार इकडील लोकांस ग्राह्य होण्यास त्यांची व जुन्या विचारांची सांगड घालून दोघांसहि इकडील पोषाख दिला पाहिजे ही गोष्ट आमच्याकडील संस्कृतादि जुन्या भाषांचा ज्यांस चांगला परिचय नाहीं. त्यांच्या हातून चांगलीशी वठेल असें आजपर्यंत घडलेल्या हकीकतींवरून आम्हांस वाटत नाहीं. लॅटिन आणि ग्रीक या भाषांचें अध्ययन विलायतेंतल्या युनिव्हर्सिटींतून आतां चालूं ठेवण्याची कांहीं जरूर नाहीं अशी विलायतेंत हल्लीं चळवळ सुरू आहे पण तो न्याय आपणांस इकडे लागूं करतां येत नाहीं. लॅटिन व ग्रीक भाषांची इंग्रजीस जी मदत झाली आहे-तितकी संस्कृतादि प्राच्य भाषांची आमच्या देशभाषांस झाल्यावर या प्रश्नाचा आम्हांस विचार करितां येईल. हल्लींच्या स्थितीत देशी भाषांची आणि त्यांच्या मातुश्रीची फारकत करूं देणें आम्हांस सर्वांशी अहितकारक आहे.

— लो. टिळक

( केसरी-तारीख ६ मार्च १८९४ )









श्री. एम्. के. हाल्दर अनु. शि. वा. नामजोशी

# पित्रार्क[1]

युरोपमधील नवजीवनाच्या चळवळीच्या सुरुवातीचा नक्की काल सांगणें कठीण आहे. कर्तृत्वाचीं उच्च शिखरें गांठण्याच्या मनुष्याच्या प्रयत्नांत एकप्रकारचें सातत्य आहे. सामान्यतः नवजीवनाच्या चळवळीची सुरुवात कॉन्स्टँटिनोपलच्या पाडावामुळें झाली असें मानलें जातें. पण ' मनुष्याबद्दलचें व अभिजात वाङ्मयाबद्दलचें कुतूहल पुन्हां जागृत होणें ' हीं दोन नवजीवन चळवळींतील महत्त्वाचीं वैशिष्ट्यें आहेत असें मानलें तर, नवजीवन चळवळीला १४ व्या शतकापासूनच सुरुवात झाली असें म्हणावें लागेल; आणि अशा चळवळीचा पित्रार्क हा पहिला अग्रदूत होय.

" मानवतावाद म्हणजे ' मनुष्य हाच श्रेष्ठ आहे आणि तोच स्वतःच्या प्रयत्नानें पूर्णत्वाकडे जाऊं शकतो ' ह्या तत्त्वांवर श्रद्धा ठेवणें होय. " पित्रार्क हा आपल्या विशिष्ट सुनित प्रकारामुळें इंग्लिश वाङ्मयांत प्रसिद्ध आहे. पित्रार्कचा जन्म १३०४ मध्यें झाला व मृत्यु १३७४ मध्यें झाला. पित्रार्कच्या वेळचें बौद्धिक आणि सामाजिक वातावरण समजल्याशिवाय, पित्रार्कची नवजीवनाला मिळालेली देणगी आपल्याला पूर्णपणें आकलन होणार नाहीं.

' मानवाच्या अंतर्बाह्य जीवनांत सुसंगति आणली पाहिजे' या मर्यादेपर्यंत ग्रीक वाङ्मय येऊन पोचलें होतें. व सिसरो हा त्याचा शेवटचा समर्थक होता. ह्या विचारांची परीक्षा होणें व ते प्रभावीपणानें पुढें मांडणें हें अत्यावश्यक होतें. परंतु ह्या कालखंडांत एक नवीन आंदोलन – एक नवीन धर्म – सुरू झालें आणि त्यानें युरोपला झपाट्यानें पादाक्रांत केलें. ( हा धर्म म्हणजे ख्रिश्चन धर्म, आणि रोमन कॅथोलिक पंथ होय). कॅथोलिक देववादी, " मनुष्यांना वाट चुकणारीं कोकरें असें मानीत आणि सनातनी देववाद्यांच्या पुस्तकांतूनच मनुष्यांना उद्धाराचा मार्ग सांपडेल " असें ते जनतेला सांगत असत. " मनुष्यानें स्वर्गांत ईश्वराच्या आणि पृथ्वीवर धर्मसंस्थेच्या ( church ) आज्ञा पाळल्या पाहिजेत " असें म्हणत. स्वर्गद्वाराची किल्ली धर्मगुरूंच्याच हातीं होती. मनुष्याच्या मानसिक जीवनावर देववाद्यांचीच सर्वंकष सत्ता होती. मनुष्याचीं आध्यात्मिक साहसेंहि देववादी साहसाशीं एकरूप पावलीं. आणि देवशास्त्राची वाढ कॅथॉलिक देववाद्यांच्या नेतृत्वाखालीं होत होती.

ग्रीक विज्ञानानें व विशेषतः ॲरिस्टॉटलनें एक निराळीच परंपरा सुरू केली होती. ती म्हणजे नैसर्गिकशास्त्रांची परंपरा आणि बुद्धिप्रधान तर्कपद्धतीची परंपरा होय. ह्याच परंपरेंतून अरबी विज्ञानाचा विकास झाला आणि अरबी शास्त्र हें ॲवेरॉसच्या वेळीं उत्कर्षाप्रत पोचलें.

ॲरिस्टॉटलचा प्रभाव इतका जबरदस्त होता कीं तो ख्रिस्ती देववाद्यांना किंवा अरब वैज्ञानिकांनाहि अमान्य करतां येईना. त्यामुळें ह्या दोघांनाहि ॲरिस्टॉटलचेंच मार्गदर्शन पत्करावें लागलें. परंतु दुर्दैवानें, बऱ्याचशा ख्रिस्ती देववाद्यांना ॲरिस्टॉटलकडे जाण्याचा प्रत्यक्ष मार्ग उपलब्ध नसल्यामुळें त्यांना ॲरिस्टॉटलचे ग्रंथ ॲवेरॉसच्या भाष्यामार्फत आणि टीकेमार्फत समजावून घ्यावे लागत. थॉमस ॲक्विनॉस ( तार्किकतेला पूर्णत्वास नेणारा ) ह्यानें सुसंगत विकासाच्या, ज्या ठिकाणीं दैवी शक्ति ढवळाढवळ करीत नाहीं पण कनिष्ठ शक्ती पूर्णत्वास जातात अशा तीन पायऱ्या ( Natura, Gratia, and Gloria ) मांडल्या; पण ॲक्विनॉसचें हें तत्त्व पोकळ होतें. कारण, त्यानें देववाद हेंच ज्ञानाचें अंतिम स्थान कल्पिलें. देववादाला, निसर्गशास्त्रांना व बुद्धिवादाला, सवलती देणें भाग पडलें. ॲरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाच्या सौम्य व पावित्र्यभंजक गुणामुळें तें तर्कवादाला पोषक ठरलें आणि ॲरिस्टॉटलशीं मतभेद होणें हें पाखंडीपणाचें लक्षण ठरलें गेलें.

---

१ " दि रॅडिकल ह्युमॅनिस्ट, " ४ नोव्हेंबर, १९५६ वरून



अनुक्रमणिका






देववादी हे ॲरिस्टॉटलशीं निष्ठावंत राहूं लागले. अशा प्रकारचें बौद्धिक वातावरण पित्रार्कच्या वेळचें होतें.

अभिजात ग्रीक व लॅटिन विद्यांवर आधारलेल्या शैक्षणिक व सांस्कृतिक कार्यक्रमाशींच इटालींतील मानवतावाद्यांचा संबंध होता. ह्या काळांतील विद्वानांनीं जुन्या परंपरेला अनुसरून कांहीं नवीन शब्द तयार केले. उदा० Studia Humanitatis or Humanities आणि ते स्वतःला मानवतावादी म्हणवून घेत असत.

पित्रार्कनें ॲरिस्टॉटलविरुद्ध बंड पुकारलें. त्याला ॲरिस्टॉटलबद्दल फारसा आदर नव्हता. कारण त्याच्या मतें प्लेटो हा थोर व्यक्तींकडून पूजिला जातो. तर ॲरिस्टॉटल हा जनसमूहाकडून पूजिला जातो. तरीसुद्धां पित्रार्कनें ॲरिस्टाटलपेक्षां त्याच्या मूर्ख अनुयायांच्याच विरुद्ध बंड उभारलें असें म्हणणें योग्य ठरेल. अरब विज्ञानाबद्दलचा त्याचा विरोध जास्त उघड होता. १७ नोव्हेंबर १३७० मध्यें गिओव्हॅनीला लिहिलेल्या पत्रांत पित्रार्क लिहितो, " मला ह्या सर्वांबद्दलच द्वेष वाटतो ! अरब वैद्यांचा दर्जा काय आहे हें तूं जाणतोसच ! ते कवी काय लायकीचे आहेत हें मला माहित आहे. अनुनय करण्याच्या पद्धतींत ते कोणालाहि हार जाणार नाहींत. त्यांच्यांत जोमहि कमी आहे. ते क्षुद्र आणि विकृत मनाचे आहेत ! " थोडक्यांत म्हणजे अरबापासून आपलें कांहीं हित होईल असें मला वाटत नाहीं.

त्याचप्रमाणें लुइजी मार्सेली नांवाच्या आपल्या मित्राला 'ॲव्हेरॉसचा' विक्षिप्तपणा उघड करणारें पुस्तक लिहिण्याची विनंती करतांना तो म्हणतो, " त्या अरबी ' कुत्र्या'ला ( ॲव्हेरॉसला ) प्राणपणानें विरोध कर. खाइस्ट तुला मदत करील. कारण, तूं खाइस्टचेंच काम करीत आहेस. "

अरब शास्त्रज्ञ ॲरिस्टॉटलला प्रमाण मानीत. ज्याप्रमाणें आपण प्राचीन कालांतील विभूतींकडे आदरानें पहातों आणि भूतकालापासून स्फूर्ति घेतों, त्याचप्रमाणें नवजीवनकाळांतील पित्रार्कसकट सर्व मानवतावाद्यांनीं अभिजात वाङ्मयाकडे धांव घेतली. सिसेरोबद्दल पित्रार्कला फार आकर्षण वाटलें. त्याला ग्रीक भाषेपेक्षां लॅटिन भाषाच जास्त अवगत होती. मात्र, प्लेटो आणि सॉक्रेटिसबद्दल त्याला फार आदर वाटत होता. प्राचीन ग्रीक व लॅटिनवाङ्मय हें त्याचें स्फूर्तिस्थान होतें.

पित्रार्कनें निसर्गवादाला जोराचा विरोध केला. सृष्ट वस्तूंबद्दलच्या तत्त्वांची त्यानें टर उडवली. व्हिन्सेंट व्यूव्हेसनें लिहिलेलें ' Speculum Naturale ' हें पुस्तक व इतरहि पुस्तकें त्यानें वाचलीं होतीं. तो लिहितो : " मनुष्याच्या स्वभावाकडे, आपल्या जीवन हेतूकडे आणि आपल्या जीवनमार्गाकडे दुर्लक्ष करावयाचें, आणि चतुष्पाद प्राणी, सापसुरळ्या, मासे इत्यादिकांचा अभ्यास करावयाचा ह्यांत काय अर्थ ? " आणि ह्या विचारांतच नवजीवन चळवळीचें वैशिष्ट्य आहे. मनुष्यानें स्वतःला जाणून घेणें हेंच अत्यंत महत्त्वाचें आहे. सोफिस्टांनीं मनुष्याला " आत्मलक्षी ". बनविलें आणि मनुष्याला सर्व वस्तूंचा मानदंड बनविला ! आणि अशा रीतीनें ग्रीकमध्यें महान युगाला जन्म दिला. ह्या दृष्टिकोनाची झलक आपल्याला पित्रार्कमध्यें भासमान् होते. ह्याचा अर्थ असा कीं, हें साम्य बरबरचेंच आहे. पित्रार्कनें सोफिस्टांचा धिःकार करण्याला कमी केलें नाहीं. " सत्य हें गुहेंत दडलेलें असतें; आणि सोफिस्टांनीं सत्याच्या मार्गावर इतकीं कांटेरीं झुडपें पसरलीं आहेत कीं, सत्याकडे जाण्याचा खरा मार्ग कोणता हेंच कळेनासें होतें. " पित्रार्क हा श्रद्धाळू कॅथॉलिक होता हेंच खरें.

" तर्कशास्त्राच्या साहाय्यानें सत्याचा थोडासा मार्ग आपण आक्रमण करूं शकूं. पण तेंच ध्येय होऊं शकणार नाहीं. आरंभीच्या कार्यक्रमांत त्याचा अंतर्भाव होऊं शकेल पण अंतिम कार्यक्रमांत होऊं शकणार नाहीं." त्याचें म्हणणें असें कीं, ॲरिस्टॉटलचें तर्कशास्त्र म्हणजे घटपटादि शुष्क चर्चाच आहेत. तें तर्कशास्त्र वांझोटें आहे. तें आपल्याला कोठेंच नेऊं शकणार नाहीं. " नेमस्तपणाच्या मर्यादा न ओलांडतां शहाणपणानें वागणें हें त्याचें ध्येय होतें आणि हें ध्येय फारसें पांडित्य नसतांनाहि आपल्याला गांठतां येईल, असें त्याचें मत होतें. मात्र तो स्वतःला सुदैवी समजतो. आणि आपण मिळविलेल्या ज्ञानाबद्दल त्याला कधींहि पश्चात्ताप झाला नाहीं. " जे खुळचट बावदूक आहेत, ज्यांना वाङ्मय-पारंगततेची खोटी पदवी चिकटवून घेण्यांतच अभिमान वाटतो त्यांची मला










कीव येते. आणि निरर्थक आणि अज्ञात अशा विषयांवर जोरजोरानें वाद-विवाद करतांना त्यांना पाहिलें कीं, मला त्यांचा राग येतो. मला त्यांच्या धनाबद्दल किंवा उद्धटपणाबद्दल किंवा डामडौलाबद्दल मुळींच मत्सर वाटत नाहीं. कारण, स्वतःला विसरून ते बाह्य उपाधींमध्यें रंगून गेलेले आहेत. ''

पित्रार्क खरें मानवतावादी तत्त्वज्ञान देऊं शकला नाहीं. कारण, तो आपल्या युगाचा प्रतिनिधि होता. त्यावेळीं कॅथॉलिक चर्च वैभवाच्या शिखरावर होतें. अशा सर्व शक्तिमान् चर्च विरुद्ध मूलगामी बंड उभारलें जाण्याची अपेक्षा त्याच्याकडून आपण करूं शकत नाहीं. चर्चपासून स्वतंत्र झालेल्या मानवाबद्दलचें कुतूहल जागृत करणें हें त्यावेळीं शक्य नव्हतें. ' मनुष्याला आत्म्याबद्दल कुतूहल वाटलें पाहिजे ' असें त्याचें म्हणणें होतें. शब्दच्छल व घटपटादि चर्चा ह्यांवर जरी त्यानें शस्त्र उपसलें होतें, तरी देववाद्यांच्या आध्यात्मिक हुकूमशाहीवरहि त्याचा परिणाम झाला. खरें सत्यशोधन हें स्वार्थप्रेरित असूं नये किंवा वितंडवादीहि असूं नये. त्याचें हें शस्त्र ॲवेरॉसच्या अनुयायांविरुद्ध होतें तसेंच तें देववाद्यांविरुद्धहि होतें. '' ह्या लोकांना काय पाहिजे आहे हें त्यांना कदाचित् पुढें कळून येईल. त्यांना प्रसिद्धी पाहिजे कीं, आनंदांत वेळ घालवावयाला पाहिजे आहे कीं, सुखी व सुसंस्कृत जीवनाचा मार्ग शोधावयाचा आहे ? त्यांना काय पाहिजे आहे मला कळत नाहीं. उदात्त माणसांना त्यांच्या ज्ञानार्जनाचें नफा हें फल इष्ट वाटूं नये. नफ्याच्या पाठीमागें लागणें हें धंदेवाईकांनाच शोभून दिसतें. उदात्त कलांना नफ्यापेक्षां जास्त श्रेष्ठ हेतू असला पाहिजेत.''

पित्रार्कनें कॅथॉलिक देववाद्यांच्या आणि अरब वैज्ञानिकांच्या दुराग्रही अशा घटपटादि चर्चेपासून मानवी विचाराला मुक्त केलें. ह्या बाबतींत अरब वैज्ञानिक आणि कॅथॉलिक देववादी ह्यांत फारसा फरक नव्हता. दोघेंहि दुराग्रही व शब्दच्छल करणारे होते. पित्रार्कनें मानवाचें लक्ष स्वतःकडे वेधलें ही गोष्ट खरी; पण नवजीवनाच्या चळवळीनें कल्पिलेल्या मानवासारखी त्याची मानवाबद्दलची कल्पना नव्हती. ' मनुष्य म्हणजे ईश्वराचें मूल होय ' अशीच त्याची कल्पना होती. त्याच्या वेळेला निसर्गवाद्यांकडून आणि देववाद्यांकडून जो दुराग्रही शब्दच्छल होत होता त्यांमुळें चर्च व ख्रिश्चन धर्म ह्यांना धोका पोचण्याचा संभव होता. त्या संभाव्य धोक्यापासून पित्रार्कनें चर्च व धर्माचें रक्षण करण्याचा प्रयत्न केला. त्याची ' मानवाबद्दलची कल्पना आपल्याला आज मान्य होणार नाहीं पण शब्दच्छल व घटपटादिचर्चा ह्यांच्या मर्यादांची जाणीव नवजीवनांतील तत्त्वज्ञांना पित्रार्कमुळेंच झाली हें नाकारतां येणार नाहीं. १५ व्या शतकांत मानवतावादाची चळवळ जोरांत सुरू होईतोंपर्यंत पित्रार्कची परंपरा जिवंत ठेवण्याचें काम पित्रार्कचा मित्र लुइजी मार्सेली ह्यानें केलें.

---

## खरें विद्यापीठ कोणतें ?

हिंदुस्थान देश प्राचीन काळीं जेव्हां विद्या व कला यांविषयीं प्रसिद्ध होता तेव्हां या देशांत विद्वानांचे मोठमोठे मठ असून तेथें रात्रंदिवस अनेक शास्त्रांचा व विद्यांचा अभ्यास नेहमी सुरू असे. बहुतेक क्षेत्राच्या ठिकाणीं विद्वानांचा मोठा समुदाय असून त्यांचा सर्व काळ अध्ययन, अध्यापन व ग्रंथरचना यांत जाई, या गृहस्थांच्या तालमींत दुसरे पुष्कळ विद्वान तयार होऊन देशभर जात, आणि इतर ठिकाणीं कोणी कोणत्याहि शास्त्राचा अभ्यास केला असल्यास त्यास आपल्या विद्वत्तेची व गुणाची परीक्षा घेण्यास या नामांकित क्षेत्रांतून जावें लागत असे. तात्पर्य, अनेक शास्त्रांचा व विद्यांचा जेथें रात्रंदिवस खल चाललेला आहे असे आश्रम जुन्या काळीं या देशांत पुष्कळ ठिकाणीं आढळून येत असत. बुद्ध लोकांचा काळ हिंदुस्थानच्या इतिहासांत अर्वाचीन समजला जातो, पण त्या काळींहि नालंदाप्रमाणें मोठमोठीं विद्यामंदिरें बांधलीं होतीं, व तेथें शेंकडों विद्यार्थी आपला विद्याभ्यास पुरा करून देशभर जात असत. शास्त्रांचा अभ्यास सतत व मनन करणारे पुष्कळ विद्वान ज्या ठिकाणीं रहातात व त्यांची कीर्ती ऐकून दूरदूरचे शेंकडों विद्यार्थी विद्यार्जनाकरितां जेव्हां त्याजपाशीं येतात तेव्हां एखाद्या स्थलास विद्यापीठ, विद्यामंदिर अथवा विद्याश्रम ही संज्ञा प्राप्त होते.

—लो. टिळक

( केसरी तारीख २५ फेब्रु. १८९६ )



अनुक्रमणिका







श्री. लक्ष्मीनारायण भारतीय

# संमिश्र भारतीय संस्कृतीची वाटचाल

## संमिश्र संस्कृति

भारतीय संस्कृति ही एका विशिष्ट अर्थानें 'संमिश्र संस्कृति' मानली गेली आहे. कोणत्याहि देशाची जिवंत संस्कृति ही एकप्रकारें संमिश्रच असते, कारण अगदीं विलग असा कोणताहि मानवसमुदाय, मानव-भाषा किंवा देश नसतो, परस्परांशीं प्रत्येकाचे संबंध केव्हांना केव्हां तरी आलेलेच असतात, म्हणून परस्परांच्या संस्कृतीवर परस्परांचा प्रभाव पडतच असतो, परंतु भारताची संस्कृति इतर संस्कृतीपेक्षां निराळी आहे. कारण या देशाचा इतिहास फार प्राचीन आहे आणि येथें निरनिराळ्या तऱ्हेचे समन्वय, संमिश्रणें इत्यादि पुष्कळच झालेलीं आहेत. आर्य, द्रविड, इतर अनार्य जाती, नंतर शक, हूण, म्लेंच्छ इत्यादि या देशांत परस्परांत बेमालूमपणें मिसळत गेले. परस्परांत ते भांडलेहि आणि परस्परांत यांचे रक्तसंबंधहि वाढत गेले. निरनिराळ्या जाती कल्पून नि विभाग पाडून निर्भेळपणा सांभाळण्याचे प्रयत्नहि कसोशीनें झाले, पण आज जरी निरनिराळ्या जाती व वर्ण येथें दिसत –आढळत असले, तरी सर्वांची संस्कृति एकच बनली. द्रविड-मंगोल-शक-हूण–यूची–आभीर–गर्दभिल्ल-यवन-बाल्हीक-तुर्क-दस्यू–निषाद–दैत्य–दानव व राक्षस वंशांचे परस्पर-संबंध, आर्यांचे या तद्देशीय लोकांशीं आलेलें संबंध, युद्ध व युद्धोत्तर काळांत घडलेलें वर्ण-संकर, अनुलोम-प्रतिलोम विवाह, दास, असुर वगैरेंच्या घेतलेल्या स्त्रिया व त्यांची संतति आणि नंतरच्या काळांतहि आलेल्या अनेक जमाती–या सर्वांचा इतिहास हेंच सिद्ध करतो कीं, या देशांत, इतर देशांच्या व जमातींच्या मानानें, फारच अधिक प्रमाणांत मिश्रण झालेलें आहे. बौद्धकालीं लिच्छवी गणराज्याच्या वेळेपर्यंत तर फारच कमी, शुद्ध आर्यांचे वंश उरले होते व चोहीकडे अनार्य, संकर वगैरेंचीच सत्ता होती. "सूत–वैदेह–मागधाः" या तिन्ही संकर जातीच मानल्या गेल्या आहेत व त्यांचीं तर फार मोठीं साम्राज्येंहि होतीं! फार अलीकडील काळांत मुसलमान आणि इंग्रजांच्या अमदानींत ही मिश्रण–प्रक्रिया मंदावली, तरी मुसलमान आणि हिंदू यांचींहि मिश्रणें कमी झालीं नाहींत.

पण हीं मिश्रणें किंवा हीं संकटें ज्या भूमींत घडलीं, त्या भूमीचा एक विशिष्ट गुण होता–सर्वांना पचवून घेण्याचा. आपापलीं निरनिराळीं घरकुलें कायम राखून निरनिराळे वंश किंवा जाती येथें राहिल्या नाहींत, तर सर्वच एका विशिष्ट संस्कृतींत एक होत गेल्या. सर्वांची मिळूनच एक संस्कृति बनत गेली. वैदिक किंवा हिंदु संस्कृतीचाच अर्थात् तो आधार होता, पण हिंदु संस्कृति अशी स्वतंत्र–निर्भेळमुळीं राहिलीच नाहीं; ती सामाजिक भारतीय संस्कृतीच बनली. इतकेंच नव्हे तर भारताबाहेरील बौद्ध-जैनांना आम्ही हिंदू म्हणूं शकत नाहीं, पण येथील बौद्ध–जैनांना हिंदूच मानतो! म्हणून डॉ. आंबेडकर बौद्ध झाले तरी येथील हिंदूंना फार मोठा फरक झाला, असें वाटलें नाहीं! तेंच जर ते मुसलमान किंवा ख्रिस्ती झाले असते, तर वाटलेंच असतें! किंवा बाहेरील एखादा ख्रिस्ती किंवा मुसलमान 'बौद्ध' झाला, तर त्यांना तो हिंदू वाटणार नाहीं! अशाप्रकारें मुसलमानी अमदानीपर्यंत येथें ज्याप्रकारें एका मिश्र संस्कृतीची वाढ होत गेली, तिचें वैशिष्ट्य निराळेंच आहे. आजहि ती एका विशिष्ट अर्थानें संमिश्र संस्कृति आहे, किंबहुना पूर्णपणें ती संमिश्रच आहे. म्हणून घटनेंतहि तिला संमिश्र (कॉंपोझिट) च म्हटलें गेलें आहे! अशा संमिश्र संस्कृतीचा वारसा अगदीं तसाच प्रत्येक प्रांतालाहि मिळाला आहे! इतकेंच नव्हे, तर प्रकर्षानें ही संमिश्रता प्रांतांत रुजली आहे.

## 'संघ-संस्कृति' नव्हे

वस्तुतः भारतदेश हा कांहीं एक प्रांत नाहीं, तर अनेक प्रांतांत विभागलेला एक देश आहे. त्या प्रांतांत








साम्येंहि भरपूर आहेत, भेदहि आहेत. तमिळनाडचा खेडूत व उत्तरेकडील खेडूत परस्परांसाठीं अगदीं परदेशीच ठरतील, पण दोघांना जोडणारा धर्माचा, देशाचा, संस्कृतीचा असा एक दुवा आहे कीं, भाषेचा किल्ला सर केला कीं, दोघांचीं अंतःकरणें चटकन एक होतात. अशाप्रकारें या देशांतील प्रत्येक प्रांत परस्पराला जुळलेले आहेत-पण एक प्रांत हा एक देश किंवा राष्ट्र नाहीं. म्हणून जी गोष्ट संपूर्ण भारताला लागू होते, नेमकी तीच प्रत्येक प्रांतालाहि लागू होते. एक सलग चित्र, एक देशिक स्वरूप आपल्यासमोर आहे, म्हणून आपण भारतीय संस्कृति म्हणतो, पण भारताला जीं विशेषणें लावतां येतील, त्यांचा स्पर्श प्रांतांना होणार नाहीं, असें नव्हे. येथें ज्या ज्या जाति-जमाती, वंश-वर्ण, व्यक्ति-व्यक्तिसमूह विरलेत, ते भारताच्या एका विवक्षित भागांतच विरलेत, असें नव्हें तर, भारताच्या प्रत्येक भागांत कमी-अधिक प्रमाणांत ती प्रक्रिया घडत गेली. म्हणून भारत जसा संमिश्र बनला तसेच प्रांतहि संमिश्र बनले. " प्रत्येक प्रांताची एक संस्कृति व त्यांची एक संघ-संस्कृति ", ही भारतीय संस्कृतीची व्याख्या कधींच बनली नाहीं. म्हणूनच भारत हा एक देश, एक राष्ट्र बनला व त्याची संस्कृतीहि एक बनली. त्यांना धर्मभावनेचेंहि खतपाणी इतकें मुबलक मिळालें कीं, सर्व विभेद–वैशिष्ट्यें कायम असूनहि एकात्मताच उत्पन्न झाली. अशाप्रकारें येथून तेथपर्यंत, प्रांतापासून भारतापर्यंत चोहींकडे संमिश्रताच दिसून येते व तिचें समग्र रूप भारतीय संस्कृतींत प्रकट होतें.

म्हणून ज्यावेळीं आम्ही प्रांतभाषेसोबत प्रांतसंस्कृतिहि जोडतो आणि ही महाराष्ट्राची, ही तमिळनाडची, ही बंगालची संस्कृति असें म्हणतो, तेव्हां तें म्हणणें आमच्या अज्ञानाचें द्योतक होय. आम्ही भिन्न रीति-रिवाज, चालीरीति, आहार-व्यवहार, स्वभाव-सवयीं यांनाच संस्कृति मानून घेतलें आहे, त्याचा हा परिणाम होय. प्रांतीय संस्कृति जर भिन्न तर मग भारतीय संस्कृतीचा अर्थच काय उरतो ? मग भिन्नभिन्न जाती नि भिन्नभिन्न वर्ण, यांच्याहि संस्कृति स्वतंत्रच मानायला हव्यात ! पण कोणत्याहि प्रकारें, भारतांत तरी, प्रांतीय संस्कृति भिन्न मानतां येणार नाहीं. प्रत्येक प्रांताचे कांहीं स्वभाव-विशेष, आहार-व्यवहार-वैशिष्ट्य आहे व ते बऱ्याच प्रमाणांत कायमहि राहतील, पण त्यांना ' संस्कृति ' नव्हे 'संस्कार'च म्हणावें लागेल. ' संस्कार ' शब्द पुरेसा नसला, तरी त्यांत तो अर्थ आणावा लागेल. त्यासाठीं ' संस्कृति ' शब्दाचा बळी देण्याची तरी मुळींच गरज नाहीं, कारण संस्कृति शब्द आम्ही वापरला कीं, मग एक-भारतीयत्वाला तडाच पडतो, विलगपणाच पत्करावा लागतो. या देशाला ' संघराज्य ' ( फेडरेशन ) मानण्यासारखाच तो प्रयोग ठरतो ! राजकीय पार्श्वभूमीमुळें शब्दच्छल करूं लागलों, तर आतांपर्यंत विकास पावत गेलेल्या सांस्कृतिक व देशीक ऐक्याचा आपण गळाच दाबल्यासारखें होईल. एकाच प्रांताचीं दोन माणसें परप्रांतांत आत्मीयता अनुभवतांत किंवा आपापल्या प्रांताविषयीं प्रत्येकाला आपुलकी वाटते किंवा प्रांतीय अस्मितेचा अभिमान वाटतो, याचा अर्थ त्या प्रांताच्या भाषेचा आणि संस्कारांचा दुवा त्यांच्यांत असतो ! भाषेमुळें जी आपुलकी निर्माण होते, ती सखोल व जिव्हाळ्याची म्हणूनच अशा ठिकाणीं मुख्य घटक भाषा हाच ठरतो. कोणतीहि भाषासुद्धां निर्भेळ नसतेच, पण त्या भाषेचें ' जीनियस ' – ' स्वत्व ' एक असतें, जसें संस्कृतीचें. मानवसंस्कृति ही मुळांत एकच असते, पण तिचे देशकालाप्रमाणें भाग पडतात, तशीच गोष्ट भाषेची आहे. दोन महाराष्ट्रीय ब्राह्मणांचे संस्कार एक असूं शकतात, पण दोन महाराष्ट्रीय ब्राह्मण – शूद्रांचें संस्कार एक नसतात, पण दोन्हीं परप्रांतांत भेटले तरी आपुलकी अनुभवतांत, कारण, तेथें समान भाषा कामीं येते. म्हणजे संस्कारांचा नंबर दुसराच ठरतो. भाषा व संस्काराच्या या तत्त्वालाहि जर कसोटीलाच लावूं म्हटलें, तर मग हाहि डोलारा पार ढासळून जातो ! समान भाषेची किंवा समान संस्कारांची मंडळी जर भिन्न जातीय असतील तर दुर्दैवानें तेथें जातच कामीं येते ! ब्राह्मण आणि शूद्र यांचे संस्कारहि एक असले, तरी त्यांच्यांत लग्नसंबंध होणें अशक्यच ! त्या ठिकाणीं प्रांतीय आत्मीयता, भाषिक आपुलकी वगैरे सर्व तोकडीं पडतात ! याउलट, दोन भिन्न भाषीय, भिन्न प्रांतीय पण समान ' जातीय ' कुटुंबें परस्परांत लग्न-संबंध सहज करतील !

### भाषेचें महत्त्व

तरी पण भाषा हा सर्वांत मोठा दुवा आहे, हें मान्य करावेंच लागेल, कारण, ही जातीय आपुलकी








किंवा समानच विशेष प्रसंगींच कारणीं लागतें, एरवीं सर्व सामान्यतः भाषा हीच त्या प्रांताचें वैशिष्ट्य दर्शविते, आपुलकीला जन्म देते आणि सेवेची प्रेरणा देते. मातृभाषा-मायभाषा ती असते आणि तिच्यासमोर तो बालवतच बनतो. सर्वसामान्यतः मातृभाषा हीच प्रांतीय भाषा असते, म्हणून त्या प्रांताशीं इतकें अभिनत्व सहज साधतें आणि मग त्यापोटीं, सर्व संचारी भाव उत्पन्न होतात. ‘ मराठी आमुची मायबोली ’ म्हणून महाराष्ट्राचा इतिहास, महाराष्ट्राचे संत, महाराष्ट्राची भूमि इत्यादि प्रिय; पण मराठी मायबोली नसूं देत, कांहीं तर सहज ढांसळतील व इतराप्रमाणेंच आपल्या भावना बनतील. मग जी श्रद्धा व जो आदर पृथ्वीराज, प्रताप किंवा छत्रसालविषयीं, तोच महाराष्ट्रांतील ऐतिहासिक पुरुषांविषयीहि ! अशाप्रकारें भाषा ही अंतरबाह्य व्यापलेली आहे, प्रांताशीं माणसाचें हृदय तिनें जोडलें आहे. नाहींतर इतकी हार्दिकता कधीं माणसानें अनुभवलीच नसती. परदेशांत एकाच देशाचीं माणसें हार्दिकता अनुभवतांत, ती ‘एकभाषीय’ म्हणून नव्हे तर ‘ एकदेशीय’ म्हणून अनुभवतांत, पण परप्रांतांत जी अनुभवतांत, तिच्या मुळाशीं ‘एकभाषा’च असते. वैचित्र्यानें-विविधतेनें नि विभिन्नतेनें नटल्या-सजलेल्या प्रांतां-प्रांताच्या संस्कार-मंदिराच्या विटा जर कोणी तटस्थतेनें नि सूक्ष्मतेनें न्याहाळील तर त्यावर एक ग्रंथच तयार होऊं शकतो. कांहीं ठळक स्वभाव आणि वैशिष्ट्येंच स्पष्ट दिसूं शकतील, बाकी तर सर्व सरमिसळच दिसेल. एका प्रांताचा दुसऱ्या प्रांतावर आणि एका देशाचा दुसऱ्या देशावर आज इतक्या झपाट्यानें प्रभाव पडत चालला आहे आणि संस्कृतींचीहि इतकी सरमिसळ होत चालली आहे कीं, विश्वैक्य अगदीं दृष्टीच्या टप्यांत आलेलें दिसत आहे, फक्त अंतःकरणेंच काय तीं दुरावलेलीं आहेत ! आणि तींहि देशा-देशांचींच नव्हे, तर प्रांता-प्रांताचीं, एकाच प्रांताचींहि दुरावलीं आहेत ! तात्पर्य हें कीं, प्रांतीय संस्कृति तर सोडाच, प्रांतीय संस्कारहि आतां स्वतंत्रपणें फारसे दाखवितां येतील, अशी स्थिति राहिली नाहीं. आहार-विहारांत-व्यवहारांतहि कमालीचा बदल होत असून पाश्चात्त्य संस्कृतीचाहि पगडा चोहीकडे बसलेला दिसत आहे. वस्तुतः सर्व देशांत नागर-सभ्यता, शहर-सभ्यता जवळ जवळ सारखीच बनत चालली असून खेडोंपाडींच कायती विभिन्नता आढळते, पण तीहि कांहीं बाबतींतच. साम्यच जास्त आढळून येईल. शेतीची पद्धति, किसानांची राहणी, धार्मिक परंपरा वगैरे चोहीकडे एकाच दुव्यानें जोडलेली दिसून पडते. फक्त प्रांतीय-स्वभाव, कांहीं प्रांतीय वैशिष्ट्येंच काय तीं अजून बचावलेलीं दिसतात. त्यांचें स्थान अर्थातच भाषेनंतरच येतें. म्हणून प्रांताचा अंतर्गत-दुवा भाषाच ठरते.

## प्रांतरचनेच्या आंदोलनांतील चुका

या भाषेलाच जेव्हां आम्ही संस्कृति-भिन्नत्वाची जोड देतो, तेव्हां भाषेचें मूलभूत महत्त्वच नष्ट करून टाकतो ! भाषावार प्रांत रचनेच्या आंदोलनांत नेमकी हीच चूक घडली आहे. भाषेला सांस्कृतिक अभिमान चिकटला, भाषेला भूमीचे तुकडे चिकटले, भाषेला जात्याभिमान चिकटला, भाषेला मालकी-भावना चिकटली ! राष्ट्रीय मालकीविरुद्ध प्रांतीय मालकी भाषेचें अवगुंठन घेऊन हैदोस करूं लागली. भाषेचे जितके धिंडवडे निघायचे होते, ते सर्व यावेळीं निघाले व प्रत्येक प्रांतानें हिरीरीनें, त्वेषानें, ईर्षेनें आपापल्या भाषांना राग-द्वेषानें न्हावूं घातलें, तिचें पावित्र्य नाहींसे केलें. ‘ भाषा व भाषिकांचा विकास ’ मागें पडला. व राजकारणानें सरकार आणि लोक, सर्वांची मदत घेऊन हलकल्लोळ माजवून दिला. परिणाम काय झाला ? एकराष्ट्रीयत्व संपुष्टांत येते कीं काय ही भीति उत्पन्न झाली. भारतीय आध्यात्मिक व सांस्कृतिक ऐक्यासोबत जर राष्ट्रीय व राजकीय एकताहि सांधत होती, तिला खिंडार पडलें. पण ही झाली स्थूल हानि. गाभ्यांत जो चिरा पडला, तोच फार भयंकर ठरला. अंतरैक्यालाच तो तडा पडला. ज्या संमिश्र संस्कृतीची जोपासना होत होती, तेथेंच खंड पडला. ज्या प्रांतांनीं एकात्म व संमिश्र भारतीय-संस्कृतीचें मंदिर उभारलें, त्यांनीच त्याला सुरुंग लावला, प्रांता-प्रांतात जी संमिश्रता, एकरसता वाढत होती, तिचाहि विकासच खुंटला. एका प्रांतांतील शेंकडों मंडळी दुसऱ्या प्रांतांत वसलेली आहेत, वसत आहेत, वसणार आहेत. त्या त्या प्रांतांत ती समरस झाली आहेत, होत आहेत, होणार आहेत. पण एका प्रांताचे दुसऱ्या प्रांतावर, त्या प्रांताचे त्यांच्यावर, बेमालूमपणें जे जे संस्कार होत होते, जी एक-जीवता वाढत होती–त्या प्रक्रियेला म्हणजेच भारतीय-संस्कृतीच्या विकासप्रक्रियेला जबरदस्त धक्का










बसला !! महाराष्ट्राचेंच उदाहरण घ्या. अनेक तेलगू (वार) मंडळी संपूर्णपणें महाराष्ट्राची बनली आहेत. आज अणे-बझलवारांना कुणीच तेलगू म्हणूं शकत नाहीं किंवा रा. कृ पाटील यांना आज कुणीच गुजराती म्हणून ओळखूं शकत नाहीं. खानदेशांतला मारवाडीहि पुरता ' भाऊ ' बनला आहे. मुख्यतः आर्थिक आणि उपजीविकेच्या कारणानें ह्या जातीजमाती बसल्या. यापैकीं अनेक जातिजमाती येथें समरस झाल्या. ज्या तशा झाल्या नाहींत, त्याहि त्याच पंथाला लागल्या. ज्यांनीं आपापलीं वैशिष्ट्यें कायम ठेवलीं, हीं फक्त जाती पुरतींच. पण " जातिवाचक " शब्द " प्रांत वाचक " बनवला गेला व परस्परांना ही मंडळी पाण्यांत पाहूं लागली ! आर्थिक शोषण हें जरी एक विशिष्ट कारण याच्या मुळाशीं असलें तरी भाषा-संस्कृति नि प्रांत यांचेंच बेसुमार वारें संचरलें आणि परप्रांतीय ' डोमिसाइल्ड ' होत चाललेलीं हजारों माणसें एकीकडे उखड्यावर पडत चाललीं, तर दुसरीकडे स्वतःचें ' प्रांतीय स्वत्व ' (!) कायम राखण्याची धडपड करूं लागलीं. प्रांता-प्रांतांत होत चाललेली संमिश्रांची प्रक्रियाहि मध्येंच खुंटली आणि वाढत चाललेला, मूळ धरत असलेला, एकात्मभावहि दुरावला व परस्परांची मनें कलुषित झालीं, परस्परांच्या द्वेष-मत्सरानें भारावलींत. आपत्काल, संकट कालच कसोटी पहातो, पण येथें तर 'तूं आमच्या मागणीशीं सहमत आहे कीं नाहीं सांग ? नाहींतर तूं आमचा दुस्मान ! तूं द्रोही !! ' अशी हिणकस व उथळ कसोटी, निकष समोर आले ! तो परप्रांताचा किंवा संबंधित प्रांताचा असला तर त्याची कंबख्तीच समजायची. तो स्वप्रांतीय असला तर शेलक्या शिव्यांनीं त्याची पूजा व्हायची !

### विश्वसंस्कृतीच्या विकासांतील व्यत्यय

संपूर्ण भारताची जी बहुमोली-बहुगुणी व आदर्श अशी संमिश्र संस्कृति भूतकालांत सर्व प्रांतांनी निर्मिली, जोपासली, वाढविली, एकरस बनविली आणि साऱ्या जगांत जिची कीर्ति त्यांनी पसरविली, त्याच प्रांतांनी आपलें नख त्याच आत्मजेच्या गळयाला लावलें ! हें भारतीय संस्कृतीच्या आत्म्याचेंच हनन नसून विश्वसंस्कृतीच्या विकासांतच हा व्यत्यय होय, कारण आज जग विश्वमानव्याकडे चाललें आहे. विज्ञानयुगामुळें सर्व जग जवळ येत असून साऱ्या विश्वाचीच संस्कृति एक होत चालली आहे. विश्वनागरिकत्वाचा पाया आज घातला जात आहे. या महत्कार्यांत सहभागी होण्याचा मोठाच भाग भारतीय संस्कृतीचा ठरणारा आहे. वस्तुतः या एकात्म भावनेला, एक जागतिक संस्कृतीला आधारभूत भारतीय संस्कृतीच ठरूं शकते, कारण अनेक वैविध्यांनी, वैचित्र्यांनी व वैशिष्ट्यांनी नटलेली, पण तरीहि एकात्म—एकरस असलेली ही भारतीय संस्कृतीच अशा जागतिक संस्कृतीचे आदर्श बनूं शकते. ज्या संमिश्र प्रांतीय संस्कृतीची परिणति भारतीय संस्कृतीत झाली, त्याच संमिश्र भारतीय संस्कृतीची परिणति विश्वसंस्कृतींत व्हायची आहे. हीच स्वाभाविक प्रक्रिया होय. अशा या महनीय युग-कार्यांत, मध्येंच, हा एक मोठा खंड पडला आणि हजारों वर्षांनी सहजगतीनें होत चाललेली प्रक्रिया थंडावली, तिला गालबोट लागलें. प्रांताप्रांतांत ही प्रक्रिया याकालीं भिन्न होती, इतकेंच.

म्हणून राष्ट्रीय आंदोलनाच्या निमित्तानें किंवा व्यापार-उद्दीमाच्या निमित्तानें किंवा सेवावृत्तीनें नोकरी-धंद्याच्या निमित्तानें आधुनिक काळांत एकेका प्रांतांत जी परप्रांतीय मंडळी वसत व समरस होत-होत प्राचीन संमिश्रतेच्या प्रक्रियेंत नव्या तऱ्हेनें नव्या मार्गानें नि नव्या रूपानें भर टाकत होती, समन्वय साधत होती, आपला प्रभाव देत-घेत होती व अशाप्रकारें नव्या स्वरुपांत संमिश्र भारतीय संस्कृतीची उपासना करीत होती, तो प्रवाह आतां पूर्ववत् अव्याहतपणें चालूं राखलाच पाहिजे, त्यांत भर टाकली पाहिजे आणि त्यांत शोषण-पीडन-स्वार्थ-संघर्ष—जातिभेद-संघर्ष वगैरेंच्या निमित्तानें जीं किल्मिषें गोळा होत होतीं, तीं दूर केलीं पाहिजेत. याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रांतांचीं वैशिष्ट्यें किंवा प्रांतांचे स्वभाव-विशेष किंवा प्रांतीय आत्मभाव हा पूर्ण लयाला जाईल किंवा जावा ! भारतीय संस्कृतीची ती शिकवणूकच नव्हे. तेथें तर विविधतेंत एकता कल्पिली आहे. पण जें पाऊल पुढें पुढेंच पडत गेलें, तें विकासक्रमानें आणखी पुढें जाऊन विश्वमानव्याची साधना त्यामुळें घडणें श्रेयस्कर कीं पुढें पडलेलें पाऊल मागें घेण्यासारखी वृत्ति निर्माण करणें श्रेयस्कर, याचा गंभीरपणें विचार करण्याची वेळ आतां आली आहे. या देशाचें एक अद्भुत वैशिष्ट्य आहे, आणि तें म्हणजे संतांनीं, साधूंनीं या एकात्मतेचीं बीजें फार खोलवर रुजवलीं आहेत. भक्ताला कोणताहि










संत, कोणतेंहि तीर्थ, कोणतेंहि मंदिर परकें-परप्रांतीय नाहीं. रामेश्वरचा निवासी काशीयात्रेसाठीं तळमळतो तर 'काशीकर' रामेश्वरला जाऊन येण्याची इच्छा बाळगतो. येथून तेथपर्यंत भारतीय संतांनीं एकात्मभावनेचा अनुपम असा साठाच गोळा करून दिला आहे. दक्षिणेंतील संतांना व धर्मपुरुषांना उत्तरेकडे धर्म-मोहीम आणल्याशिवाय संतोष वाटला नाहीं व उत्तरेकडील जैन-बौद्धांना दक्षिणेकडे गेल्याशिवाय चैन पडलें नाहीं. येथून तेथपर्यंत, चोहीकडे त्यांनीं भक्तीचें-सद्भावनेचें-सहृदयतेचें-सहजीवनाचें-ऐक्याचें-लोण पोंचविलें आणि अखंडता निर्माण केली कीं, कितीहि प्रयत्न केले तरी ती तुटणें शक्य नाहीं. अनेकांनी राष्ट्रीय आंदोलनाच्या विभिन्न अवस्थेंत त्या अखंडतेची जोपासना चालू ठेवली. गांधी-विनोबांनी तर अखिल भारतीय सेवकत्वच निर्माण केलें आणि त्यामुळें या प्रांताचा माणूस त्या प्रांतांत जाऊन सेवा करूं लागला.

## सांस्कृतिक एकात्मतेची गरज

खरोखर, या भारतीयसंस्कृतीच्या एकात्म-भावनेला कोणकोणत्या मार्गांनी खतपाणी दिलें गेलें, हें जर कुणी शोधूं म्हटलें तर आपण थक्क झाल्याशिवाय राहणार नाहीं त्या शोधापुढें! साध्या व्यापाऱ्यापासून तो धर्मपुरुषापर्यंत सर्वांनीं सर्वच मार्गे यांत हातभार लावला आहे. संस्कृत भाषा व संस्कृत वाङ्मयानें हेंच लोण पोंचविलें आहे तर परस्परांवर आलेल्या संकटांनीहि हार्दिकता वाढविली आहे! ज्या विशाल मंदिराची उभारणी इतक्या तपःपूर्वक व्हावी, त्या मंदिराला अशाप्रकारें तडे पडावेत, हें कमी दुःखद नाहीं! आज जग कितीतरी पुढें चाललें आहे आणि आम्ही मात्र परस्परांना आतांपर्यंत जोडून ठेवणारे दुवेच तडातड तोडून टाकत आहोत! व आधार कोणता तर भाषेचा-कीं जी केवळ हृदयें जोडणारीच म्हणून मानली जाते! तिला जोड कुणाची दिली गेली, तर संस्कृतीची, कीं जी 'विकृती'ची शत्रूच! पण काय आमचें दुर्दैव कीं, आम्ही याच देशांतल्या भाषांचीच संस्कृति भिन्न मानतो! दक्षिणेच्या चार भाषा द्रविड कुळांतल्या व बाकी सर्व संस्कृत-प्राकृतच्या वंशज, पण त्यांच्याच वंशज भाषा-भगिनींची ही संस्कृति मात्र प्रत्येकीची निराळी म्हणजे उद्या मराठी कुणी विसरला व दुसऱ्या प्रांतांत राहिल्यामुळें तेथील भाषा शिकला, तर त्याची एक संस्कृति गेली व दुसरी आली! तात्पर्य, प्रांतभाषा जशा भिन्न, तशा संस्कृतिहि भिन्नच, हें म्हणणें अगदींच कुचकामाचें ठरतें.

सारांश, प्रांतीय अस्मितेचाच फार उदोउदो हा वस्तुस्थितीला धरून नाहीं, हें आपण मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, कारण इतिहासच तसें सिद्ध करतो. भाषिक ऐक्याला भाषिक, एकरसतेला व भाषिक भावनेला दुसरीं बांडगुळं न चिकटविण्यांतच भाषेचें हित आहे. कमींत कमी भारताच्या संमिश्र संस्कृतीच्या विकासाच्या आणि प्रांता-प्रांतांत नव्या स्वरूपांत घडत असलेल्या संमिश्रतेच्या प्रक्रियेच्या आड तरी आज या गोष्टी आणल्या जाऊं नयें, यांचा विकास अवरुद्ध करूं नये; उलट विकासाला सहाय्यभूत घटनांचा व निर्णयांचा आणि परिस्थितीचा लाभच घेतला जाण्याचा प्रयत्न कसोशीनें करावयास हवा, हें आजच्या परिस्थितींतून वर उठून निरीक्षिलें, तर सहज पटूं शकतें! कांहीं गोष्टी मनाविरुद्ध घडतात, कांहीं निर्णय मनाविरुद्ध होतात; पण त्यांतून जर चांगलें साधतां आलें, त्यांचा उपयोग करतां आला, तर त्याचा परिणाम चांगलाच होईल, वाईट होणार नाहीं. या ठिकाणीं आम्ही मुंबईप्रांताच्या निर्मितीच्या इतिहासांत जात नाहीं किंवा त्या प्रश्नाच्या औचित्या-अनौचित्याच्या वादांतहि पडत नाहीं. आम्ही फक्त एका सांस्कृतिक विकासाच्या दृष्टिकोनांतून या घटनेकडे बघतो, तेव्हां असें वाटतें कीं, या घटनेचा लाभ भारताच्या संमिश्र संस्कृतीला मिळावा, असा जर प्रयत्न केला तर त्यांत महाराष्ट्राचेंहि नुकसान नाहीं, गुजरातेचेंहि नाहीं. उद्या ही घटना बदलली तरी या समन्वयी प्रयत्नांचा उपयोग अनाठायीं जाणार नाहीं व भारतीय संस्कृतींत ती भरच पडेल; उलट परस्परांत सौहार्द वाढविण्याला ती कारणीभूत होईल.

## एक इष्ट सूचना

या दृष्टीनें मागें श्री. शंकररावांनी सुचविलें होतें कीं, या दोन्ही प्रांतांच्या भाषिक – सांस्कृतिक–वाङ्मयीन संस्था व प्रवृत्ति यांच्या समन्वयाच्या दृष्टीनें आतां कसोशीनें प्रयत्न व्हायला हवेत. नेमकी भारतीय संस्कृतीच्या व्यापक विकासप्रक्रियेला बळ देणारीच सूचना त्यांनी केली. ती जर अमलांत








आली तर भारताची संमिश्र संस्कृति त्यांचा हा हविर्भाग इतक्या मोलाचा मानील कीं, त्यांचें हें ऋण ती कृतज्ञतेनें स्वीकारल्याशिवाय राहणार नाहीं. भाषावार प्रांत रचनेच्या कामांत त्यांची तपश्चर्या अनुपम ठरली आहे. त्या ध्येयाच्या एकात्म नाऱ्यांतून त्यांनी सुरुवातीलाच द्वैभाषिक प्रांताची योजना पुरस्कारिली. त्यांत जरी मुंबई शहराचा प्रश्न अंतर्भूत होता, तरी दोन्ही प्रांतांचे पारस्परिक निकटतेचे मधुर संबंधहि आपला प्रभाव टाकीत होते. नंतरच्या काळांत अनेक गालबोटें त्याला लागलीं, व एक प्रकारें अस्वाभाविक मार्गानेंच हा निर्णय समोर आला, हें खरें पण आतां या घटनेचाच उपयोग योग्य रीतीनें केला गेला तर त्यांतून चांगलेंच निष्पन्न होईल. भाषिक एकात्मता प्रत्येकाची कायम ठेवूनहि हें सहज साधतां येण्यासारखें आहे. प्रांता-प्रांतांच्या संमिश्रतेची जोपासना झाली व तिनें अखिल भारताचा टप्पा गांठला, आतां अखिल भारताच्या या संमिश्र संस्कृतीद्वारें विश्वाचा टप्पा गांठावयाचा आहे. या प्रक्रियेची जगांत कांहीं कमी प्रशंसा झाली नाहीं. इतिहासज्ञ डाडवेलनें लिहिलें आहे कीं, "भारतीय संस्कृति महासमुद्रासमान आहे, जिच्यांत अनेक नद्या विरल्यात!" दुसरे एक विचारवंत श्री. सी. ई. एम् जोड लिहितात : "मानवजातीला भारतीयांनी जी सर्वांत श्रेष्ठ वस्तु वरदान म्हणून दिली, ती म्हणजे ही कीं, भारतीय नेहमींच अनेक जातींच्या लोकांत व अनेक प्रकारच्या विचारांत समन्वयच स्थापन करीत आलेत–त्यासाठींच तत्पर राहिलेत. सर्व तऱ्हेच्या विविधतेंतूनच ऐक्य कायम राखण्याची त्यांची शक्ति व योग्यता अद्वितीय अशीच राहिली आहे!" अलीकडील काळांत ही 'रसायन–प्रक्रिया' थंडावली खरी, परंतु काळहि आतां बदलला आहे. नव्या स्वरूपांतच ही परंपरा पुढें चालवावी लागेल आणि विश्व-मानव्याची वाटचाल पत्करावी लागेल, सामासिक-संमिश्र अशा विश्व-संस्कृतीच्या जोपासनेचा प्रयत्न करावा लागेल. अर्थातच त्यासाठीं कांहीं गोष्टी स्वीकाराव्या लागतील, कांहीं सोडाव्या लागतील, विज्ञानयुगानें आज सर्व मानवांनाच एक केलें आहे म्हणून आज नव्या स्वरूपांतच भारतीय संमिश्र संस्कृतीचा विकास होईल. या नव्या स्वरूपाला पोषक–आणि परंपरागत संमिश्रतेच्या प्रक्रियेलाहि पोषक–म्हणून ज्या ज्या घटना, ज्या ज्या रचना व ज्या ज्या गोष्टी घडतील, त्यांचें स्वागतच करुन त्यांचा उपयोग करून घेतला तर परिणाम सर्वहितकारी तर होईलच, भारताचें अग्रेसरत्वहि पूर्ववत् कायम राहील व हें आजच्या गोंधळलेल्या मन:स्थितींत व कलुषित वातावरणांतहि शक्य आहे, कारण आजहि जनतेचें हार्द शाबूत आहे व चोहीकडे थोडीच नजर फेकली तर चिखलांतूनहि अनेक सुंदर कमळं उगवलेली दिसूं शकतील. आज हें हार्द परस्पराशीं जुळलेलेंहि आहे, म्हणूनच 'कलावंताच्या आनंदपर्यटनांत ग. दि. माडगूळकरांना आनंदोर्मि येतात व ते नाचत-बागडत गातात! त्यांना दुसऱ्या भाषेंत स्फूर्ति येते आणि इतर मंडळीहि याचेंच कोरस बनवतात, तर तिकडे 'कानुभाई'हि लगेच दुसऱ्या कवनानें प्रतिसाद देऊन सहवासाचा निर्मल आनंद उपभोगितात! लोकजीवनांत वैयक्तिक स्नेह-संबंधांचा सुगंध दरवळणारीं अशीं शेंकडों उदाहरणें दोन्ही प्रांतांतून सहज सांपडूं शकतात. म्हणून एका महान् ऐतिहासिक कार्यांत समभागी होण्याची जी संधी परस्परांना लाभली आहे, तिचा उपयोग करून घेणें कठिणहि नाहीं आणि गुजरात-महाराष्ट्रासाठीं तें एक फार मोठें दिव्य आहे, असेंहि नाहीं; कारण प्राचीन काळापासूनच दोन्ही प्रांत भक्तीच्या आनंद-प्रवाहांत एकरस होत आले आहेत, म्हणूनच

उत्पन्ना द्राविडे चाहं कर्णाटे वृद्धिंगता ।
स्थिता किंचित् महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ॥

असें पद्म-पुराणानें 'भक्ति'द्वारें वदविलें आहे! आजहि तीच परंपरा गांधी नि विनोबांच्या रूपानें नवीन मूल्यें व नवीन उन्मेष घेऊन गुजरात-महाराष्ट्राला धन्य करून भारताच्या पुनर्जीवनाद्वारें जगाला शांतिमार्गाकडे झपाट्यानें नेत आहे. आणि आतां तर महाराष्ट्र माउलीच्या मंदिरांत लोटांगण घालींत येऊं घातलेले विनोबा– 'बाल' विनोबा-महाराष्ट्राच्या संत-तेजाद्वारें, ऋषि-प्रकाशाद्वारें साऱ्या भारतालाच अहिंसेची दीक्षा देण्याच्या मार्गावर आहेत! अशा महत्त्वाच्या क्षणीं जर परिस्थितींतून वर उठून आपण अभिक्रम आपल्या हातीं घेतला, तर तें संपूर्ण देशाला अद्वितीय मार्गदर्शन होईल, यांत शंकाच नाहीं.

लें. प्रा. मायकेल पोलॅनी अनुवादक–तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# मार्क्सवादाची जादू

## : १ :

मार्क्सवादाचा प्रचारकीय प्रभाव हें अत्यंत विचारणीय असें अनैतिकतेमधील नैतिक शक्तीचें उदाहरण आहे, असें म्हणतां येईल.

इसाया बर्लिननें मार्क्सच्या चरित्रांत मार्क्स अशा स्वरूपांत दाखविला आहे कीं, मार्क्स हा स्वतः भविष्यदर्शी असलेल्या ध्येयवादाचा पुरस्कार करतो, परंतु तें करीत असतां त्यांत ध्येय-विषयक सर्व निर्देशांचा तिरस्कार अन्तर्भूत करतो. त्याचा ध्येयवाद म्हणजे अन्तर्विरोधानें भरलेलें दूषित तत्त्व आहे. याच तत्त्वाचा हत्यार म्हणून उपयोग करतांना मार्क्सचें प्रचारकीय अलौकिक कौशल व्यक्त होतें.–" मार्क्सच्या नांवानें प्रसिद्ध झालेले अनेक जाहीरनामे आणि कार्यक्रम यांत जे लेखणीचे फटकारे दिसून येतात आणि भयानक असे जातां-जातांना केलेले टीकात्मक निर्देश आढळून येतांत, त्या सर्वांचा रोख शाश्वत न्याय, मानवी ऐक्य, व्यक्तीचे व राष्ट्रांचे हक्क, विवेक-स्वातंत्र्य, सांस्कृतिक संग्राम अशा प्रकारचे वाक्यप्रयोग साफ नष्ट करण्याकडे दिसून येतो. हे वाक्यप्रयोग त्या वेळच्या लोकशाही चळवळीचें कायम वापरावयाचें भांडवल होतें. मार्क्सला असें वाटत होतें कीं, ही व्यर्थ लबाडी आहे, विचारांचा गोंधळ आणि निरुपयोगी यत्न यांचे दर्शक ते वाक्यप्रयोग आहेत. "

न्याय, समता व स्वतंत्रता यांच्याबद्दल तिरस्कार असूनहि सोविएट रशिया हा याच ध्येयांचा खरा पुरस्कर्ता म्हणून अनेकांनीं पतकरला आहे असें नव्हें तर, रशियाकडून तसा तिरस्कार व्यक्त केला जातो या कारणामुळें त्या ध्येयांचा पुरस्कर्ता म्हणून तो पतकरला आहे. हन्ना आरेंटनें समर्पक रीतीनें म्हटलें आहे कीं, " बोल्शेविकांचें रशियांत व इतरत्र असें आग्रहानें सांगणें असतें कीं, आम्ही सामान्य नैतिक मर्यादांना मान्यता देत नाहीं; हें सांगणें कम्युनिस्ट प्रचाराचा मुख्य आधार आहे; हा प्रचार बरोबर ह्याच नैतिक भावनांना व नैतिक मर्यादांना आवाहन देतो.

विरुद्ध अशा ह्या सिद्धांतांत इतकी श्रेष्ठ श्रद्धोत्पादक शक्ति कां असावी ? याचें उत्तर माझ्या कल्पनेप्रमाणें असें आहे कीं, नैतिक तत्त्वांबद्दल स्वतःमध्यें असलेल्या शंकेनें व्यथित असलेल्या आधुनिक मनाला नैतिक भावनांचा उपभोग व कठोर वस्तुवादाबद्दलची तृष्णा या दोन्हींचें समाधान करणारी शैली या सिद्धान्तांत अन्तर्भूत आहे. ' विरोध-विकासयुक्त भौतिकवादी ' तत्त्वज्ञानाच्याद्वारा मार्क्सवाद आपल्या युगांतील उच्च नैतिक गतिशीलता व मानवी व्यवहार म्हणजे वस्तुवादानुसारें चालणाऱ्या यांत्रिक प्रक्रिया होत असें मानण्यास लावणारी विवेचक दृष्टी यांच्यामधील विरोधास खुबीनें दृष्टिपथाच्या बाहेर नेतो. ज्या उभयतो व्याघातांनीं ( dilemmas ) उदारमतवादी मन पांगुळतें आणि अडखळतें ते व्याघातच मार्क्सवादाचा आनंद व शक्ति होय; आपल्या नैतिक वासना जितक्या अधिक उधानास येत असतील व आपली वस्तुनिष्ठ दृष्टि जितकी अधिक नीति-निरपेक्ष बनलेली असेल तितकी या परस्परविरोधी तत्त्वांची सांगड अधिक प्रभावी बनते; या सांगडीमध्यें हीं विरोधी तत्त्वें एकमेकांस दृढ बनवूं लागतात.

हा गुण समजावून घ्यावयाचा असेल तर, मार्क्स जसा समाजवादाच्या तृष्णेनें व पुंजीवादाच्या भयानें भरलेला होता तसें तुम्ही भरलेले आहांत अशी स्वतःबद्दल कल्पना करा. स्वतंत्रता, न्याय व बंधुता या ध्येयांकडे या दृष्टीनें बघतांना तुम्हांस उदाहरणार्थ असें दिसेल कीं, या ध्येयांवर आधारलेला नेपोलियनचा विधिग्रंथ सामंतशाहीचा विनाश करण्यांत व युरोपभर खाजगी उद्योगांच्या पद्धतीस अनुकूल असा मार्ग पुंजीशहांस मोकळा करण्यांत अत्यंत यशस्वी झाला. तुमच्या हेंहि लक्षांत येईल कीं, तो विधिग्रंथ त्या काळापासून आतांपर्यंत पुंजीवादी व्यवस्थेचा प्रतिपालक बनला. त्या व्यवस्थेनें ज्या सामंतशाहीची नियमसंस्था उखडली त्या सामंतशाहीचा व ज्या कामगार-



अनुक्रमणिका






वर्गाचें दास्य चालूं ठेवलें त्या वर्गाचा विरोध करणाऱ्या त्या पुंजीशाहीचें बाह्यरूप म्हणून हीं ध्येयें आहेत, असें तुम्हांस दिसेल व पुंजीशाहीच्या नैतिक ध्येयांमध्यें पुंजीशाहीचे हितसंबंध गर्भित आहेत, असेंहि दिसेल. पुंजीवादाच्या अनैतिक रूपाचें आविष्करण हा वैज्ञानिक समाजवादाचा अभावात्मक अंश आहे;

आतां दुसरी गोष्ट म्हणजे समाजवादी क्रांतिकारक कृतीचा विचार करा. कामगारवर्गानें एके दिवशीं पुंजीशाहीचा निःपात केला आहे आणि स्वतंत्रता, न्याय व बंधुता यांचें राज्य स्थापन केलें आहे, असें घडवून आणण्याच्या उत्कंठेनें तुम्ही भरलेले आहांत. परंतु स्वातंत्र्य, न्याय व बंधुता यांच्या नांवानें ही मागणी तुम्ही मागूं शकत नाहीं; कारण तुम्हांस अशा भावनाप्राधान्याचा तिरस्कार आहे. म्हणून तुम्ही समाजवादाच्या ध्येयाचें अद्भुत भावरम्य रूप बदलून विज्ञान बनवितां. सध्यां पुंजीशाहीनें बंधनांत ठेवलेल्या संपत्तीचा व सुखाचा नवा प्रवाह कामगारवर्गानें उत्पादन-साधनें काबीज केल्यामुळें मोकळा सुटतो, ही गोष्ट ठासून सांगण्याच्या योगानें तुम्ही त्याचें विज्ञान बनवितां. हें ठासून सांगण्यानें समाजवादाच्या नैतिक आकांक्षांचें समाधान होतें. अशा आकांक्षांनीं भरलेले लोक त्याचा वैज्ञानिक सत्य म्हणून स्वीकार करतात. ह्यामुळें नैतिक आकांक्षांना वैज्ञानिक निर्णयाचा आकार मिळतो; हा दुसरा विधायक गर्भित अंश होय; ही मार्क्सवादाची दुसरी शाखा होय. वैज्ञानिक मुखवट्याच्या योगानें, ही केवळ भावना विवशता होय म्हणून व्हावयाच्या निंदेपासून नैतिक भावनांचें रक्षण होतें; आणि त्याचवेळीं, याच्या योगानें भौतिक ऐहिक ध्येयांच्या पोटांत नैतिक भावनांचा उत्साह भरतां येतो.

## अबाध्य दोष

आतां ही गोष्ट कोणासहि दिसून येईल कीं, मार्क्सवादाच्या या दोन्ही (अभावात्मक व विधायक) शाखा, नीतीला कांहीं स्वगतशक्ति असते हें नाकारून काम करतात; व इतकें करूनहि नैतिक वासनांना आवाहन देतात. पुंजीशाहीचें दोषदर्शन करणें हा या पृथक्करणाचा अन्तस्थ हेतु असल्यामुळें ह्या पृथक्करणाचें पर्यवसान पुंजीशाहीचें ढोंग उघड करण्यांत होतें. असें मानतां येईल कीं, नैतिक उद्देशांचें भौतिक, ऐहिक हितसंबंधाच्या स्वरूपांत केलेलें पृथक्करण हें सामान्यतः कोठेंहि लागूं पडतें म्हणून जे कोणी त्याच्या योगानें ढोंग उघडकीस आणतात त्यांचेहि नैतिक उद्देश त्यामुळें हिणकस ठरतात. परंतु हे उद्देश स्पष्टपणें उद्घोषित झाल्यामुळें त्यांचें ढोंग बाहेर न येतां ते शाबूत राहतात. पुंजीशाही ध्येयवादांचें ढोंग उघडकीस आणण्याच्या पद्धतीनें ते त्यांत कोणताहि नैतिक निर्णय जाहीर न करतां, इतरांमध्यें सामर्थ्यशाली नैतिक भावनांचें उत्थापन करतात; परंतु हें ढोंग उघडकीस आणण्याचें काम शुद्ध वैज्ञानिक परिभाषेंत चालवितात. त्यामुळेंच प्रचाराचें असें फळ त्यांच्या पदरांत पडतें; त्या कारणामुळें नैतिक रूप आणण्याची शंकाहि स्पर्श करूं शकत नाहीं.

अर्थात् हीं 'वैज्ञानिक' विधानें मान्य होतात याचें कारण, त्यांच्या योगानें कांहीं विशिष्ट नैतिक भावनांचें समाधान होतें, हें होय. पुंजीशाही ध्येयवादांच्या संबंधाची मीमांसा आणि आवृत उद्देशांचें ढोंग उघडकीस आणण्याच्या प्रवृत्तीच्या मुळाशीं असलेले आच्छादित उद्देश यांच्यामध्यें स्वसमर्थनार्थ चाळवाचाळव सुरूं असलेली येथें आपणांस दिसते. नैतिक आकांक्षांचें समाधान करतात, म्हणून मान्य केलेलीं जीं वैज्ञानिक म्हणून स्वीकारलेलीं विधानें असतात तीं त्या नैतिक आकांक्षांना अधिक उत्तेजित करतात; त्यामुळें त्या आकांक्षा तथाकथित वैज्ञानिक विधानांची समाधान करण्याची शक्ति वाढवितात; असें हें सारखें चालत असतें. आणखी असें कीं, ह्या गतिशीलता-वस्तुनिष्ठा यांच्या संयोगांत नेहमी आत्मरक्षणाचें सामर्थ्य असतें. त्याच्या वैज्ञानिक अंशावरील आक्षेपाचें निरसन त्याच्या पाठीशीं असलेल्या नैतिक भावनांनीं केलें जातें आणि त्यावरील नैतिक आक्षेपांचें निरसन त्यांतील वैज्ञानिक शोधांच्या अबाधित निर्णयाच्या आवाहनानें थंडपणें पार पाडतां येतें. गतिशीलता व वस्तुनिष्ठा या दोन अंशांपैकीं प्रत्येक अंश दुसऱ्यावरील आक्षेपाच्यावेळीं आपल्याकडे लक्ष खेचून घेतो.

मार्क्सवादावरील पांडित्यपूर्ण टीकाकरणाऱ्यांनीं उघडकीस आणलेल्या तर्कदोषाला हीच रचना आधार देत असते ही गोष्ट आपणास दिसून येईल. कामगारवर्ग पुंजीशाहीचा नाश करणार ही गोष्ट अपरिहार्य आहे, हें

मार्क्सवादी भविष्य खरें मानलें तर, त्याच्या आधारावर कोणताहि अमलांत आणावयाचा राजकीय कार्यक्रम निष्पन्न होऊं शकणार नाहीं; असें टीकाकार सांगतात. कारण, ज्या युद्धाचा निर्णय अगोदर ठरून गेला आहे, त्याकरितां योद्धयांची भरती करण्याचा प्रयत्न निरर्थक ठरतो; आणि जर युद्धाचा निर्णय ठरलेला नसेल तर त्या युद्धाचा परिणाम काय होईल याबद्दल अनुमान करणें चुकीचें होय. परंतु **गतिशीलता-वस्तुनिष्ठा संयोगाच्या** क्षेत्रांत, इतिहासाचा एक विशिष्ट परिणाम घडून यावा म्हणून युद्धार्थ सज्ज होण्यास आवाहन करणारें ऐतिहासिक भविष्य सांगण्यावर तर्कदोषाचे उद्‌भाव करतां येत नाहीं. कारण, समाजवादी उद्दिष्ट न्याय्य आहे अशी आपली श्रद्धा आहे म्हणून आपण भविष्य मान्य करतो; समाजवादी चळवळ योग्य आहे, असा याचा अभिप्राय आहे. भविष्यकथन म्हणजे चळवळीस आवाहन होय.

परंतु येथें हें एक अतिरिक्त सांगावयाचें आहे. आपल्या विकृत श्रद्धेनें प्रौढ समाजशास्त्राच्या विद्वत्तापूर्ण परिभाषेच्या मुखवट्यामध्यें आपली पावित्र्याची तृष्णा लपविण्यास लावलें असेल तर तो मुखवटा करुणास्पद होय. वैज्ञानिक विधानांच्या रूपानें रंगविलेल्या नैतिक भावनांत परिवर्तन घडून दुर्दैवानें त्याचें निराळेंच पर्यवसान होतें. मार्क्सवादी चळवळीवरील कोणताहि नैतिक आक्षेप, ती चळवळ वैज्ञानिकदृष्टया योग्य आहे, या उत्तरानें निरस्त करतां येतो, असें सांगतांना मी ही गोष्ट मागेंच सूचित केली आहे. यामुळें काय होतें तें आपण पाहूं या — समाजवादाचा नैतिक उद्देश वैज्ञानिक पर्यायांनीं युक्त अशा विधानांच्या मध्यें रूपान्तरित केला तेव्हां तो मूलभूत नैतिक संदर्भापासून विभक्त झाला. नैतिक भावनांना दूर लोटणारी अशी आकांक्षा ती बनली. हाच धर्मोन्माद ( Fanaticism ) होय; मुळांतील नैतिक आकांक्षांचे जे भौतिक पर्याय तयार केले त्यांच्यावर केंद्रित झालेला धर्मोन्माद होय; हे भौतिक पर्याय म्हणजे कामगारवर्गाचे हितसंबंध; किंवा अधिक यथार्थपणें म्हणावयाचें तर, कामगारवर्गाच्या हितसंबंधांचें प्रतिनिधित्व करणारे म्हणून मानले गेलेल्या लोकांच्या हातांतील जुलमी सत्ता. हा सत्तेचा उन्मादपूर्ण संप्रदाय होय; म्हणजेच नैतिक शीलाच्या माणसाची बन्धनांत पडलेली उडी होय.

## अनैतिकतेचें नैतिक आवाहन

आधुनिक सर्वाधिकारवादांतील जाणूनबुजून पतकरलेली विवेकहीनता कशी आहे याचा आणि अविवेकानें उघडपणें वागण्याच्या त्यांतील निर्धारांत नैतिक आवाहन कां आहे याचा उलगडा यामुळें होतो. कारण, हा निर्धार असें दाखविण्याकरितां केलेला असतो कीं, त्यांतील शक्ति पावित्र्याचें मूर्तरूप आहे, म्हणून त्याचें कांहीहि करून श्रेष्ठत्व स्थापित करणें व त्याचा बचाव करणें या शिवाय अधिक मोठी कोणतीहि जबाबदारी नाहीं. या निर्धारानें जे प्रशासन करतात ते दया व सचोटी यांचा तिटकारा करतात असें गृहीत धरलेलें असतें; ते केवळ विशिष्ट अनिवार्य परिस्थितीमुळें असें वागत नाहींत ( – मॅकिवेलीनें त्यांना अशा स्थितींत अनुमति दिली असती– ) तर त्यांच्या नीतिवादी प्रतिस्पर्ध्यांमधील भावनावशता, ढोंग, व सामान्यतः गबाळपणा जो असतो या बाबतींत त्यांचा नैतिक वरचढपणा असल्यामुळें. म्हणून जे संशयवादी सर्व नैतिक उद्दिष्टांची सत्यता तिरस्कारपूर्वक नाकारतात ते अशा नग्न सत्तेला पाठिंबा देण्याकरितां धर्मोन्मादानें एकत्रित येतात.

मार्क्सवाद एकदां अंगीकारिला म्हणजे नीतीचा सार्वभौम महिमा आणि तिचें सत्तेवरील व भौतिक परिस्थितीवरील वास्तविक परावलंबित्व यामधील शाश्वत विसंगति मार्क्सवाद काढून टाकतो. मार्क्सवाद असें करूं शकतो याचें कारण, तो नैतिकतेचा बहाणा सोडून देतो, परंतु लगेंच एका विशिष्ट प्रकारच्या राजकीय चळवळीच्या परीघांत गर्भितस्वरूपांची नैतिकता अर्पित करतो. मार्क्सवाद हा स्वाभाविक रीतीनें पवित्र असलेल्या चळवळीनें अनिवार्य विश्वविजय संपादून त्याच्याद्वारा सार्वभौम नैतिक महिमा साध्य करतो.

मार्क्सवाद हा भौतिकवाद आहे असा चुकीचा आरोप केला जातो. त्याचा भौतिकवाद हा त्याच्या नैतिक उद्दिष्टाचा बाह्य मुखवटा आहे. हें मात्र खरें आहे कीं, भौतिकवादी आवरणाच्या योगानें समाजवादासंबंधीं आकांक्षांना नैतिक संदर्भापासून अलग करतां आलें आहे व त्यामुळें भौतिक इतमाम व राजकीय हिंसा करण्यांत त्यांचा पूर्ण उपयोग करतां येत आहे. परंतु त्याच्या योगानें त्यांच्या मुळाशीं असलेली समाजवादी गतिशीलता नष्ट होत नाहीं. कम्युनिस्ट










अनुक्रमणिका

राज्यांचें भावनात्मक समर्थन म्हणजे सामाजिक प्रयत्न-वादाचा उत्साह हा कायम टिकला आहे. म्हणूनच सर्व आर्थिक प्रयत्नांत नैतिक अर्थ भरण्याचा त्यांचा खटाटोप असतो; म्हणूनच जनतेच्या तातडीच्या गरजा—उदाहरणार्थ सुधारलेलीं राहतीं घरें-वगैरेंची उपेक्षा करुन गगनचुंबी सुबक इमारती, भूमिगत संगमरवरी महाल इत्यादि भव्य महिमाशाली गोष्टींचा हव्यास त्यांचा चालूं शकतो; म्हणूनच त्यांची विलक्षण आर्थिक पद्धति निभावूं शकते; म्हणजे उत्पादनावर सारखा भर असतो, परंतु जीवनाच्या गरजांचा कायम तुटवडा राहतो. आम्ही पश्चिम युरोपांतील लोक सोविएट रशियांत भौतिकवादाचीं लक्षणें केव्हां दिसतील याची आशेनें वाट पहात आहोंत. कारण, एकदां कां ही राजवट भौतिक सुखसोयींचा पाठपुरावा करूं लागली कीं, तिच्यांतील धर्मोन्मादच नष्ट होईल. सुखसोयीचें प्रेम गर्ह्य असेल परंतु त्यांत जुळवून घेण्याची वृत्ति असते असा कोणासहि विश्वास वाटूं लागतो.

आपल्या काळांतील इतर जनताचळवळींतहि अनैतिकतेचें नैतिक आवाहन प्रभावी झालें आहे. मायनेक-(Meinecke) ला याचा प्राथमिक आकार सर्व जर्मनांच्या एकत्वाच्या चळवळींत आढळला; आणि हिटलरच्या उत्कर्षानें हें पृथक्करण प्रतारकरूपानें शब्दशः खरें ठरलें आहे. बोल्शेविकांच्या उदाहरणाचा हिटलरला उपयोग खूप झाला; परंतु त्याच चळवळीनें प्रथमतः भावनारम्य जर्मन विनाशवादामध्यें मूळ धरलें होतें. या वादानें असें उपदेशिलें होतें कीं, असाधारण महत्त्वाची व्यक्ति, 'हमकरे सो कायदा', या रीतीनें वागते, आणि मुत्सद्दी या नात्यानें स्वतःची इच्छा बाकीच्या जगावर अविवेकीपणें लादत असते; त्याचप्रमाणें एखाद्या राष्ट्रास आपलें ' ऐतिहासिक भवितव्य' नैतिक जबाबदारीची पर्वा न करतां सिद्ध करणें हा हक्क व कर्तव्य असतें. मार्क्सवादानें चित्रिलेलें यांत्रिक मानवी चित्र ज्याप्रमाणें करतें त्याप्रमाणें नीतीच्या सार्वभौम अधिकारांचा असे उपदेश विरोध करतात; एक विशिष्ट व्यक्तीची वा राष्ट्राची परिपूर्ति म्हणजेच नीति असे ते उपदेश सांगतात. यामुळें आपल्या या युगांतील अमर्याद सामाजिक आकांक्षांचा भयंकर देशभक्तीशीं सांधा निर्माण होऊं शकतो; आणि हिटलरच्या जर्मन विश्वराज्याच्या रूपानें या दोन्ही गोष्टी आकारास येऊं शकल्या असत्या.

हिटलरच्या कार्यक्रमांत मोठ्या नैतिक भावनांचा अन्तर्भाव होता म्हणून त्यांतील बेदरकारपणांतून जबरदस्त नैतिक आवाहन निघत होतें, अशी उपपत्ति लागते. जेव्हां जेव्हां बेदरकारपणाचा धर्मोन्मादाशीं संयोग होतो तेव्हां तेव्हां आपणांस गतिशीलता – वस्तुनिष्ठा, हें द्वन्द्व त्यांत आहे अशी शंका आलीच पाहिजे. हिटलरचा मद हा मुळांत पापमय होता, परंतु त्याच्यांतील जर्मन तरुणांस मिळणारें आवाहन नैतिक होतें; त्यांनी पापमय कृतींचा नैतिक कर्तव्य म्हणून स्वीकार केला होता. मार्क्सच्या मतानें सार्वजनिक जीवनांतील नैतिक हेतूंच्या स्वरूपासंबंधीं जे निर्णय ठरले तेच निर्णय त्या तरुणांच्या प्रवृत्तीचे कारण झाले. त्यांचा असा विश्वास होता कीं, असे नैतिक हेतु केवळ सत्तेचीं बौद्धिक समर्थनें होत, सत्ता हेंच मूळ सत्य आहे. म्हणूनच नैतिकरूप देण्याचा त्यांना तिरस्कार होता; आणि विवेकशून्य हिंसेबद्दल त्यांना नैतिक ओढा होता.

कांही वर्षांपूर्वी मी यासंबंधीं जें प्राथमिक विवेचन प्रसिद्ध केलें त्यांत या सिद्धान्ताला ' नैतिक विपर्यास ' असें नांव दिलें. अर्थात् हा विपर्यास प्रत्यक्षांत पूर्णतेस कधींच जात नाहीं. कारण, कोणतेंहि राज्य कितीहि धर्मोन्मादवश असलें तरी कांही स्पष्ट नैतिक मर्यादा मानल्यावाचून चालूंच शकत नाहीं. मन वळविण्याचा प्रयत्न करण्याचें बंधन नग्नसत्तेसहि पाळावें लागतें. कांहीं स्पष्ट नीतिनियमांना प्रसंगीं अवसर द्यावा लागतो एवढ्यानेंच ' नैतिक विपर्यासाचे ' सिद्धान्त लागूं पडत नाहींत असें नव्हे.

**: २ :**

## सुशिक्षितांचें प्रलोभन

नैतिक विवेकाच्या उघड तिरस्कारांतील नैतिक आवाहनानें आणखी एक कोडें उलगडतें; हें कोडें म्हणजे स्टालिनच्या राजवटींत त्या राजवटीस धन्यवाद देणाऱ्या लेखकांच्या व चित्रकारांच्या कृतींना दूषण देण्यांत येऊन त्यांना दडपून टाकलें. 'बन्धनांतलें मन' या पुस्तकांत झेस्लॉ मिलोझनें म्हटल्याप्रमाणें आधुनिक कला व वाङ्मय याबद्दलच्या सर्वविदित घृणेमुळें अंशतः व सर्व सांस्कृतिक यत्न राज्याच्या सेवेकरितां करवावयाचे या निर्धारामुळें हें आवाहन प्रभावी झालें. मिलोझनें स्वतःच्या पोलंडमधील अनुभवांवरून असें नोंदून

ठेवलें आहे कीं, मार्क्सवादानें पोलंडमधील सुशिक्षितांना लावलेल्या प्रलोभनाचा भाग ह्या भावना व धोरणें बनलीं आहेत.

ही गोष्ट कळण्याकरितां पुंजीशाहींतून समाजवादाकडे होणाऱ्या स्थित्यंतरामधील विचाराच्या प्रत्येक स्वरूपास मार्क्सवादाची विधायक व विध्वंसक, अंतःप्रवेश व ढोंग उघडें पाडणें ही प्रक्रिया लागूं करतां येते, हें आपण प्रथम विचारांत घेतलें पाहिजे. ज्याप्रमाणें पुंजीशाहीच्या ध्येयांत स्वातंत्र्य व लोकतंत्रता यांचें ढोंग असतें असें उघडकीस आणायचें असतें व त्याचवेळीं पक्षाच्या हुकूमशाहींत स्वभावतःच स्वातंत्र्य व लोकतंत्रता हे गुण असतात असें दाखवावयाचें असतें; त्याचप्रमाणें पुंजीशाहीच्या कलेंत व वाङ्मयांत ढोंगीपणा असतो असें दाखवावयाचें असतें आणि समाजवादाच्या अंध स्तुतिपाठांत कला व वाङ्मय यांच्या मूल्यांची संपत्ति असते, असें प्रतिपादावयाचें असतें. सर्व सांस्कृतिक जीवनांत अशाप्रकारचें रूपान्तर घडवून आणलें जातें. समाजवादीराज्याच्या हितसंबंधांच्या बंधनांत सर्व जीवन हुकूमशहांच्या इच्छेप्रमाणें बंदिस्त केलें जातें हीच सर्वव्यापी हुकूमशाही होय; स्वतंत्र देशांतील सुप्रसिद्ध सुशिक्षितांना त्यांच्या व्यवसायाला दडपून व दूषित करणाऱ्या ह्या हुकूमशाहीचें आकर्षण कां वाटावें हाच प्रश्न आहे.

'ढोंगाचा परिस्फोट' या शब्दांत या कोड्याच्या उत्तराची खूण सापडते. १९ व्या शतकांतील पुंजीशाही वर्चस्वाच्या विरुद्ध केवळ समाजवाद बंड करीत नव्हता किंवा पुंजीशाहीच्या ध्येयांवर हल्ला करण्याचें हत्यार केवळ वैज्ञानिक प्रवृत्तिच नव्हती. सुशिक्षित वर्गाचें एकंदरींत दूरत्व हेंहि त्याबरोबर होतें. भावनारम्यतावादाच्या व वैज्ञानिक चळवळींच्या संयुक्त परिणामांपासून आधुनिकांचा सांस्कृतिक शून्यवाद उत्पन्न झाला व त्यानें मार्क्सवादाइतकाच संपूर्णपणें वर्तमान समाजव्यवस्थेचा निषेध केला. जेव्हां आधुनिक मानवाच्या अतिशायी नैतिक आकांक्षांचा माणसांच्या निर्धास्तपणानें, स्वार्थानें व ढोंगानें आशाभंग केला तेव्हां हें घडलें. नीति म्हणजे टाळतां येत नाहीं म्हणून लोकांनीं मान्य करावयाची एक गोष्ट, असा अर्थ केला तरच या न्यूनांची उपपत्ति लागते; असें त्यांना दिसलें. आणखी असें कीं, मार्क्सवादासारखेंच विलक्षण अशा दृढ नैतिक आकांक्षाचें लक्षण म्हणजे त्यांच्या ठिकाणचा नैतिक शून्यवाद होता; टुर्गेनी-(Turgenev)नें याचें चित्रण बाझारो (Bazarov) या विद्यार्थ्याच्या रूपानें केलें; हा विद्यार्थी, तात्त्विक शून्यवादाचा साहित्यांतील मूळ साचाच होय.

आम्ही हेंहि मान्य करतों कीं, व्यक्तिसंबंधीं शून्यवाद (Personal nihilism) हा एक शतकभर साहित्याचा व तत्त्वज्ञानाचा प्रेरक बनला; या वादानें स्वतः आणि विरुद्ध प्रतिक्रिया प्रक्षुब्ध करून हें काम केलें. युरोपखंडांत १९ व्या शतकाच्या मध्यापासूनच्या काळांत ललितकथा, काव्य व तत्त्वज्ञान यांचे सार्वत्रिक विषय पुंजीशाही समाजाची घृणा, अनीति व निराशा हेच बनले. क्षुद्र जीवन जगणाऱ्या माणसांशीं विरोधी असलेल्या विचारसरणीनें आधुनिक स्वैराचारी माणूस निर्मिला, आणि त्याच्या ठिकाणीं बंडखोरीची नवनिर्माणशक्ति उत्पन्न केली; त्यामुळें भूतकाळांतील कोणत्याहि ऐतिहासिक युगाला साधल्या नाहींत अशा उच्चतम कृतींची निर्मिति करून ललित कलांना नावीन्य आणिलें.

परंतु या विजयांनीं कलाकर्त्यांना आत्मशंकेमुळें निर्माल्यवत् बनविलें. मान्यता पावलेल्या ध्येयांच्या बद्दल त्यांच्या ठायीं असलेल्या द्वेषानें (मार्क्सवादाप्रमाणें) मानवाचें महत्त्व व मानवी विचार यावरच प्रत्यक्ष आघात केला. पीर गिंट (Peer Gynt)नें अनेक वेषवेषांतरें केलीं व शेवटीं स्वतःची त्याला ओळख कांद्याच्या रूपकानें अशी पटली—प्रत्येक नाटकी रूपाचा पापुद्रा एका पाठीमागून एक एक असा काढून टाकून शेवटीं गाभ्यांत कांहीं शिल्लक रहात नाहीं. विश्वकोशकर्ते बोवर्ड (Bouvard) आणि पेक्युके (Pecuchet) व्यर्थ गोष्टींच्या गुंतागुंतींत सांपडून नष्ट होतात. मुसिलचा (Musil) 'संपत्तिहीन मनुष्य' (Man without properties) अस्तित्व गमावतो, कारण, तो जीवन जगण्यापेक्षां जीवनाचा विचार करीत राहतो. सार्त्र (Sartre)च्या 'बुद्धियुग' (L'Age de Raison) मधील माथ्यु (Mathieu) 'विचार, विचाराबद्दल विचार, विचाराबद्दलच्या विचाराचा विचार, करीत शिणून जातो; उलट कॅमू (Camus) चा 'परका' (Stranger) माणूस संपूर्णपणें विचारपराङ्मुख असतो; तो इतकाच वस्तुस्थितीपासून



अनुक्रमणिका





विभक्त झालेला असतो व स्वतःच्या खाजगी जीवनाच्या बंदीखान्यांत अडकतो.

एवंच आपण सद्भावनेनें कांहींहि सांगूं शकत नाहीं, व सर्व विवेकयुक्त क्रिया व्यर्थ मामुली गोष्टी बनतात; हिंसाच केवळ प्रामाणिक होय; स्वैर हिंसा हीच महत्त्वाची मान्य क्रिया होय, या अवस्थेपर्यंत पोंचल्यावर आधुनिक माणूस नैतिक व सांस्कृतिक-दृष्ट्या व्यर्थ असलेल्या वर्तमानकाळाबद्दलच्या बीभत्स घृणेच्या विषयांत स्वतःचा अन्तर्भाव करील. हें विश्व केवळ अर्थशून्य ठरल्यावर तो वैश्विक वैराणप्रदेशांत स्वतः विरून जातो.

अशा स्थितींत ढोंग उघडकीस आणण्यास टपलेल्या मार्क्सवाद्यानें जर सुशिक्षित वर्गावर आघात केला, त्याला पुंजीशाही वर्गाच्या माळेंत गोंवलें, तर त्याची अवस्था कठीण होते. त्याच्या वैराणजीवनांच्या वाढत्या जाणीवेंत स्वतःच्या कलेचें व विज्ञानाचें मार्क्सवादी विवेचन प्रतिध्वनित होऊं लागतें. मार्क्सवादी विवेचनाप्रमाणें कला व विज्ञान हीं निंद्य अशा पुंजीशाहीचीं ( superstructures ) बाह्यरूपें होत. यावर आणखी असें कीं, या मार्क्सवादी टीकेच्या कसल्याहि विरोधानें त्या टीकेचें न्याय्यत्वच सिद्ध केलें जातें; कारण, त्या विरोधानें तो सुशिक्षित जबरदस्तीनें पुंजीशाहीचा भागीदार ठरविला जातो; त्यामुळें ज्या पुंजीशाही-विरोधी स्थानावर त्याचा स्वाभिमान आधारलेला असतो तें स्थानहि त्याच्यापासून हिसकलें जाण्याचा धोका उत्पन्न होतो. सार्त्र ( Sartre ), पिकॅसो ( Picasso ) आणि बर्नाल ( Bernal ) यांच्यासारखे लोक, ज्या तत्त्वज्ञानानें त्यांच्या बौद्धिक व्यवसायाला धोका पोंचतो त्यास कां शरण जातात, याचो उपपत्ति लावण्यास ही उभयत: आपत्ति ( dilemma ) पूर्ण उपयुक्त ठरते.

राजकीय प्रयत्न हा जर शून्यवादी गृहीत कृत्यावर आधारलेला असेल तर त्या प्रयत्नाला तात्त्विक शून्यवाद्याच्या आवृत नैतिक आकांक्षाचा उपयोग नेहमीच होतो. विवेकशून्य अशा क्रांतिकारक सत्तेचें अन्तर्गत पावित्र्य मान्य करून तो आपल्या नैतिक आकांक्षांमध्यें निर्वेधपणें रंगून जाऊं शकतो. त्याच्या नैतिक आकांक्षा हिंसेच्या एंजीनमध्यें ओतल्यावर विस्तार पावूं शकतात व त्यांना आत्मशंकेचा धोका रहात नाहीं. अशा न गंजणाऱ्या गुणाच्या सामाजिक गृहामध्यें त्याची सर्व व्यक्तिमत्ता आनंदानें व्यवहार करूं लागते. हें मात्र मान्य करावें लागतें कीं, असें असतांहि कलाकार वा वैज्ञानिक माणसास आपल्या व्यवसायाची खरी परिपूर्ति म्हणून कम्युनिस्ट हुकूमशाहीचें रूक्ष सांस्कृतिक उद्देश मान्य करणें कठीण जातें. परंतु अत्यंत हीन नसलेल्या कांही उद्देशांकरितां तो आपल्या ठिकाणच्या घृणेस बाजूस करण्याचा प्रयत्न करूं शकतो. कारण, त्याच्या योगानें तो कुजक्या समाजाच्या कुजक्या संस्कृतीच्या संबंधापासून किंवा कोणत्याहि समाजाच्या संबंधापासून मुक्त होतो. त्याला असें वाटणें शक्य आहे कीं, कम्युनिस्ट समाजसंस्थेंतील त्याचें सेवकत्वाचें नातें कांहीं काळापुरतेंच आहे. कारण, अखेरीस, ऐतिहासिक नियतीचा विजय झाला म्हणजे तो विजय शरीराच्या व मनांच्या गरजांची पूर्ति करणारच; आणि कांहीं झालें तरी, मध्यंतरीं सरकारी सांस्कृतिक धोरणास प्रासंगिक तोंडी पाठिंबा देण्यापेक्षां त्याच्यापासून जास्त कांहीं अपेक्षा केली जाणार नाहीं.

: ३ :

## मार्क्सवाद व विज्ञान

१९३०च्या सुमारास नव्य मार्क्सवादाच्या विज्ञानोपपत्तीस महत्त्व आलें; आणि नंतरच्या दशकांत स्टालिनच्या कारकीर्दींत यू. एस्. एस्. आरच्या सरकारची मान्यता तिला लाभली. प्रथम ही उपपत्ति विज्ञानेतिहासाचा अर्थ लावण्याकरितांच स्वीकारण्यांत आली होती; तिच्या योगानें असें दाखविण्यांत आलें कीं, विज्ञानाची प्रत्येक प्रगतीची पायरी ही व्यावहारिक गरजांची पूर्ति करण्याकरितां अस्तित्वांत आली. शुद्ध विज्ञानाला स्वतंत्र स्थान असतें, ह्या गोष्टीचा पोकळ पांडित्य म्हणून उपहास करण्यांत आला. विज्ञान हें मुळांत तंत्रपद्धतिच ( technology ) होय ही गोष्ट विज्ञानाचा बुरखा बाजूस सारून दाखविल्यानंतर तंत्रपद्धतिच वास्तविक विज्ञान होय असा तंत्रपद्धतीचा महिमा गाण्यास प्रारंभ झाला. तंत्रपद्धतीनें भौतिक प्रगति होते म्हणून ती प्रगतीचा व समाजवादाचाच भाग म्हणून मान्यता पावली; म्हणून विज्ञानाची साधना शेवटीं समाजवादाच्या प्रगतीचें मूर्तरूप बनली.

हें एथपर्यंत निरर्थक परंतु निरुपद्रवी झालें. परंतु लवकरच बुरखा बाजूस करण्याची क्रिया तडाखेबाज बनली. ' पुंजीशाही विज्ञाना'च्या आधुनिक संशो-








धनांवर म्हणजे सापेक्षतेचा सिद्धान्त, परिमाणनिष्ठ यान्त्रिकता ( quantum mechanics ), ज्यौतिष व मानसविज्ञान यांच्यावर विखुरलेली गोलंदाजी सुरू झाली व मेंडेलकृत सिद्धान्त-( mendelism ) विरोधी आक्रमणापर्यंत त्याची परिणति झाली. जेव्हां १९४८ च्या ऑगस्टमध्यें लायसेंको-( Lysenko ) नें विजयीवृत्तीनें विज्ञानविद्यापीठापुढें असें घोषित केलें कीं, कम्युनिस्ट-पक्षाच्या मध्यवर्ती समितीनें माझे जीवविज्ञानसंबंधीं विचार मान्य केले. तेव्हां सर्व सदस्यांनीं एकदिलानें अभ्युत्थान देऊन त्यास धन्यवाद दिले; ह्यासमयीं विज्ञानसंबंधीं विशिष्ट बाजू पक्की झाली.

आतां विज्ञानाची सर्वव्यापिता निश्चितपणें खंडित झाली. पुंजीशाही विज्ञानाचे सर्वव्यापितेचे दावे फसवी विचारसरणी म्हणून उघडे पाडले; आणि सोविएट विज्ञानाच्या प्रामाण्याचा आधार पक्षपातीपणा किंवा वर्गलक्षणा म्हणून स्पष्टपणें स्वीकारला गेला. मार्क्सवादामध्यें दुहेरी योजना असल्यामुळें, सर्व विज्ञान हें वर्गीय विज्ञान असतें ह्या सिद्धान्तानें पुंजीशाही विज्ञानाचें मूल्य उतरविलें व समाजवादी राज्याच्या विज्ञानाचें मूल्य चढविलें. असा एकदम दुहेरी उपयोग ह्या सिद्धान्ताचा झाला. पक्षीय विज्ञानास मदत करून नव्या अर्थानें पक्षीय विज्ञानाचा सर्वव्यापितेवरील अधिकार स्थापित केला; म्हणजे स्वभावतः पवित्र व म्हणूनच ऐतिहासिकदृष्ट्या अपरिहार्य असलेला भावी कम्युनिस्ट-विश्वराज्याचा विजय हा सर्वव्यापी सत्याच्या स्थानीं आणून बसविला.

सोविएट विज्ञानाचें मूल्य चढविण्याच्या या पद्धतींतील ‘ वस्तुनिष्ठा ’ व ‘ पक्षपातिता ’ हे दुहेरी अर्थ स्वयं-सुसंगत आहेत. वस्तुनिष्ठा व सर्वव्यापी प्रामाण्य या बाबतींतील पुंजीशाही विज्ञानाचे अधिकार हे खोटे देखावे आहेत हें सिद्ध केलें आहे; हें सिद्ध करण्याचा आधार म्हणजे कोणतेंहि विज्ञान, इतिहास वा तत्त्वज्ञान वस्तुनिष्ठ असूं शकत नाहीं, आणि वस्तुतः तीं विशिष्ट वर्गाचीं हत्यारें असतात; हा सिद्धान्त होय. याबरोबरच असेंहि प्रतिपादिलें आहे कीं, मार्क्सवादाच्या छत्राखालीं चालणारी राजनीति हें विज्ञान असून त्याचें आचरण ज्या सामाजिक परिस्थितींत करावयाचें असतें त्या परिस्थितीचें पक्कें वस्तुनिष्ठ मूल्यमापन करून त्यावरच तें आधारलेलें असतें. म्हणून मार्क्सवादी विज्ञान एका मर्यादेपर्यंत वस्तुनिष्ठ असतें; ही मर्यादा म्हणजे कामगार-वर्गाच्या राजकारणाचें हत्यार म्हणून उपयुक्तता असणें. हें लक्षांत ठेवा कीं, ‘ वस्तुनिष्ठा ’ किंवा ‘ पक्षपातिता ’ ही युक्त नाहीं वा अयुक्तहि नाहीं. समाजवादच युक्त ( म्हणजे वाढीस लागलेला ) असतो व पुंजीशाही अयुक्त ( म्हणजे नाशोन्मुख झालेली ) असते. स्टालिनच्या राजवटीची सोविएट विद्वानांच्या बाबतींत अशी मागणी होती कीं, त्यांनीं वस्तुनिष्ठेस ( म्हणजे सर्वव्यापी प्रामाण्यास ) टाकावें व त्याऐवजीं समाजवादी पक्षपातीपणाच्या अनुरोधानें जावें; ही मागणी मार्क्सवादाच्या वस्तुनिष्ठेच्या दाव्याशीं अगदीं सुसंगत अशीच होती.

### तथ्याचा त्याग

नैतिक विपर्यासाच्या प्रक्रियेनें तथ्यांच्या कल्पनेची, तथ्यासंबंधीं सर्वसाधारण सामग्रीच्या कल्पनेची हेळसांड होते. खरें पाहतां, आपला तथ्यावरील विश्वासाचा मोठा भाग इतरांवरील भरंवशानें अप्रत्यक्षरीतीनें तयार झालेला असतो; पुष्कळशा उदाहरणांत विशिष्ट व्यक्तींना त्यांच्या सार्वजनिक स्थानामुळें किंवा ते आपले बौद्धिक नेते आहेत म्हणून प्रमाण मानून चालावें लागतें. विज्ञानाच्या क्षेत्राबाहेरील सार्वजनिक तथ्यें ( Public facts ) स्वतंत्र समाजसंस्थेंतील वृत्तपत्रांवर, संसदांवर किंवा न्यायालयांवर भरंवसा ठेवूनच स्वीकारावीं लागतात. त्यांतील तथ्य-संशोधन समाजशास्त्रज्ञांच्या, इतिहासज्ञांच्या व विज्ञानपंडितांच्या कार्याशीं संलग्न असतें; त्यांत अशीं कांहीं विवाद्य उदाहरणें असतात कीं, त्याविरुद्ध असलेलीं विधानें सामाजिक मान्यतेकरितां स्पर्धा करीत असतात तरी, सर्व समाज त्यांना महत्त्व आहे असें गृहीत धरून चालतो; विज्ञानाप्रमाणेंच विश्वासांच्या देवघेवीची ही पद्धति एकमेकांत गुंतलेल्या क्षेत्रांच्या मालिकेवर अवलंबून राहते; या प्रत्येक क्षेत्रांत कांहीं थोडीं अधिकारसंपन्न माणसें एकमेकांच्या सचोटीवर देखरेख ठेवतात; त्यांचा विचार महत्त्वाचा असतो. अशा प्रकारचें परस्परांवरील विश्वासाचें जाळें बाळगणाऱ्या समाजांत हन्ना ॲरेंटनें म्हटल्याप्रमाणें 'तथ्यानुसारिते'ची विशिष्ट कसोटी टिकविली जाते.

ज्यावर स्वतंत्र समाजांतील तथ्यांवरील ऐकमत्य अवलंबून असतें. तें हें परस्परांवरील विश्वासाचें विस्तृत



अनुक्रमणिका






झालें कच्चें असतें. ज्या विग्रहानें समाजांत स्पष्ट फाटाफूट निर्माण होते, त्याच्या योगानें परस्परां-वरील विश्वास नष्ट होऊं लागणार; आणि त्यामुळें विग्रहाशीं संबद्ध अशा तथ्यांसंबंधीं सार्वत्रिक ऐकमत्य साधणें दुर्घट होणारच. फ्रान्समधील तृतीय गणराज्याच्या पायाला धोका पोंचला तो तथ्यविषयक प्रश्नावरच; प्रश्न असा होता कीं, कॅप्टन ड्रेफसनें तें पुरावापत्रक लिहिलें होतें काय ? अमेरिकेंतील ॲल्जर हिसच्या खटल्यांतल्याप्रमाणें ब्रिटनमध्यें झिनोविवच्या पत्राच्या अस्सलपणाबद्दल विवाद उत्पन्न झाला; या विषयांतील तथ्यासंबंधीं लोकांत इतका वाद माजला कीं, सार्वत्रिक ऐकमत्य होणेंच अशक्य झालें.

राजकीय भावनाविवशतेचा तात्पुरता अतिरेक म्हणून अशाप्रकारचें तथ्यानुसारितेचें तत्कालिक व मर्यादित अपयश क्षम्य ठरूं शकेल. परंतु एखादें आधुनिक क्रांतिवादी राज्य सर्व समाजाचा कायापालट करण्याचा उद्देश ठेवून तथ्यसंशोधनाच्या प्रक्रियेचा आधार असलेली सर्वसंमतीनें निष्पन्न होणारी श्रद्धा नष्ट करतें; कारण विरुद्ध मतवाद्यांशीं सर्व प्रकारचे संबंधच तें तोडून टाकतें. त्याला बिनशर्त मान्यता जो देत नसतो तो त्या राज्याचा भयंकर शत्रू गणला जातो. हुकूमशाही अशी एक प्रकारची परिस्थिति उत्पन्न करते कीं, त्यांत कोणीहि मतभेद बाळगणारा वस्तुत: तिचा शत्रूच बनतो; त्यामुळें अमर्याद संशयाचें वातावरण निर्माण होणें प्राप्त ठरतें. जेव्हां उघड मतभेदाला वाव रहात नाहीं तेव्हां अप्रीति ही कांहीं मामूली गोष्टींत व्यक्त होऊं लागते; त्यामुळें गुप्त-पोलिसाला मामूली घटनांचा खोटा बनाव कटाच्या गोष्टींची पूर्व तयारी म्हणून दाखविण्यास मुभा मिळते.

मज्जाविकारी माणसाच्या परीक्षेंत फ्रॉईडची पद्धति अंगीकारली असतां ज्याप्रमाणें कांही गृहीत कृत्यांवर आधारलेली तपासणी चालते त्याप्रकारची विशिष्ट गृहीत कृत्यांवर आधारलेली तपासणी या राज्यांत चालते. पितृद्वेष-गंड ( Oedipus-complex ) आहे असें गृहीत धरून रोग्याचा उच्चारित व अनुच्चारित प्रत्येक शब्द व रोग्याची आचारलेली व न आचरलेली प्रत्येक कृति ( किंबहुना सहज योगा-योगानें ज्या घटनेंत तो सांपडलेला असतो ती घटना ) हें सर्व सुप्त पितृद्वेषाचें आविष्करण होय, असा अर्थ फ्रॉईडच्या पद्धतीनें केला जातो. त्याचप्रमाणें, कोणत्याहि मामूली घटनेचा अप्रीतीची खूण म्हणून अर्थ करतां येतो असें गृहीत धरल्यावर, त्यापुढें जाऊन, ती घटना राज्यद्रोहाचें कृत्य म्हणूनहि ठरविणें शक्य होतें; मग स्टालिनच्या कारागृहांत तथ्याविष्कारार्थ वापरलेल्या पद्धती उद्दिष्टाशीं सर्वथा अनुरूपच दिसतील. ख्रिश्चन धर्मन्यायालयांच्या दृष्टीनें यातना देणें ज्या कारणांकरितां अपरिहार्य ठरलें त्याच कारणास्तव शारीरिक यातनांचे उपायहि अपरिहार्य दिसतील. कारण जोपर्यंत आरोपीचा कबूलीजबाब मिळत नाहीं तोपर्यंत मनुष्याच्या गुप्त उद्देशासंबंधीं केलेले आरोप पक्के सिद्ध झाले असें म्हणतां येणार नाहीं. आणि जो कबूलीजबाब जबरदस्तीनें काढून घेतलेला असतो त्याचा जे कबूलीजबाब देत नाहींत व त्याकरितां अनुनयात्मक प्रतिकार जोरांत करीत राहतात त्यांच्याशीं विरोध सुरूं होतो; अशा कबूली-जबाबानें दडपशाहीच्या धाकानें मान्य झालेलें सार्व-जनिक तथ्यांचें काल्पनिक जग वाढीस लागतें.

राजकीय हत्यार म्हणून निर्मिलेलीं विद्यापीठें, अशाप्रकारचीं सार्वजनिक तथ्यें मान्यता पावण्याच्या प्रक्रियेस, राज्याच्या हितार्थ मदत करतात. आरोपी-च्या कृतींवरील विघातकतेच्या आरोपाच्या पुष्ट्यर्थ इतिहासकार आरोपीच्या इतिहासाच्या पूर्वभागांतील कृत्यांचा नवीन अर्थ लावून दाखवितात. ज्या कथा एरवीं असंभवनीय म्हणून वाटल्या त्याच सत्ताधारी-पक्षाच्या कट करण्याच्या अवस्थेंतील अनुभवाशीं जुळूं शकतात असें दाखवून शक्य कोटींतल्या ठरतात. एखाद्या श्रेष्ठ कम्युनिस्टावर तो पोलिसाकडून नेहमी पगार घेत असे असा आरोप खरा मानण्यांत कांहीं चूक नसते. कारण, उदाहरणार्थ, मॅलिनोस्कीच घ्या. मॅलिनोस्की लेनिनच्या अत्यन्त विश्वासांतला कटांत सामील असलेला साथी होता. व तो डूमा सभेंतील बोलशेविक गटाचा नेताहि होता; परंतु नंतर तो नेहमीच गुप्त पोलिस होता असें ठरलें.

आधुनिक क्रांतिकारक पक्षांतील निवडक लोकांना अत्यंत पक्षपाती राजकीय दृष्टिकोण वापरण्याचें शिक्षण दिलेलें असतें. हन्ना ॲरेंटनें लिहिलें आहे कीं, सत्य व कल्पित यांतील फरकच ओळखतां येऊं नये, असेंच शिक्षण पक्षाच्या सदस्यांना दिलें जातें. तथ्या-संबंधी केलेलें प्रत्येक विधान विशिष्ट गर्भित हेतूचें निदर्शन असतें असें त्वरित दाखविण्याची योग्यता








हीच त्यांच्या मोठेपणाचें लक्षण मानलें जातें. धाक व गुप्तता यांचा प्रभाव वगळला तर हा प्रचार पाहिजे तितक्या प्रमाणांत परिणामकारक होणार नाहीं; धाक व गुप्तता यांच्या योगानें संशयास्पद गोष्टींना रंग भरणारी परिस्थिति तयार होते, अशा स्थितींत राजकीय तथ्यांचा लोप होतो; म्हणजे माणसानें अशा स्थितींत सर्वच तथ्यें कुचकामाचीं म्हणून टाकायचीं किंवा स्पष्ट सबळ प्रमाणें नसतांना मनास वाटतील तीं तथ्यें मान्य करावयाचीं.

: ४ :

## मार्क्सवादोत्तर उदारमतवाद

कोणत्याहि राजकीय सत्तेला आधुनिक सर्वाधिकारशाहीची गतिशीलता तिच्या तर्कसिद्ध मर्यादांपर्यंत अमलांत आणतां आली नाहीं. सत्तेच्या एका विशिष्ट केंद्राच्या सेवेकरितां सर्व प्रकारच्या विचाराला संपूर्णपणें जुंपण्यापर्यंत मजल मारणें ही गोष्ट वस्तुतः अगदीं अव्यवहार्य दिसते. सरकारी शब्दजंजालाच्या दालनांत उभारलेल्या कृत्रिम जगाला सामान्य भाषेत व्यक्त केलेल्या नैसर्गिक मानवी भावनांची जोड द्यावी लागते; प्रसंगविशेषीं त्या सर्वांचे पुंजच पुनः उभारावे लागतात. हें असें १९३० मध्यें घडलें; तेव्हां रशियाच्या ऐतिहासिक जाणीवेच्या गाभ्यांत राष्ट्रीय भावनांची व परंपरागत वीरांची मांडणी पुनः करावी असें क्रेमलिननें ठरविलें; त्याकरितां एम्. एन्. पोक्रोवस्की ( १८६८-१९३२ ) चा न खंडिलेला सिद्धान्त टाकावा लागला; पोक्रोवस्कीनें मार्क्सवादी पद्धतीनें केलेल्या समाजशास्त्रीय पृथक्करणांत इतिहासरचना बसविली होती. दुसऱ्या एका प्रसंगीं १९५० मध्यें स्टालिननें एन्. वाय्. मार (१८६४-१९३४) चा चुकीचा सिद्धान्त खंडिला. त्या सिद्धान्ताप्रमाणें सर्व भाषा ही वर्गीय भाषा असते; त्या हुकूमशहानें उदारमतवादी परिभाषा मुक्तपणें वापरून या सांप्रदायिक सिद्धान्तानें सोविएट भाषाशास्त्र कसें पायदळीं तुडविलें आहे याचें स्पष्ट चित्रण केलें; त्या हुकूमशहानें उदारमतवादाचीं तत्त्वें समर्पक रीतीनें वापरून हुकूमशाहीच्या विचारनियंत्रणाचा निषेध केला; त्या क्षणापर्यंत असलें विचारनियंत्रण त्यानें स्वतःच लादलें होतें.

स्टालिनच्या मृत्यूनंतर विचाराला हळूं हळूं स्वातंत्र्य मिळूं लागलें; हें होण्याचें कारण, मार्क्सवादाच्या हिंसक शस्त्रागाराखालीं जिवंत गाडलेल्या उदारभावना पुनः पाझरूं लागल्या, हें असणें संभवतें. हा पावित्र्याचा बंधनस्थ उत्साह विकृत निग्रहांतून मुक्त केलेला असेल; आणि जाणूनबुजून घोषित केलेल्या नैतिक आकांक्षांच्या जोडीस जाऊन बसेल.

किंवा बहुधा, सर्वाधिकारशाहीच्या जुलुमाची प्रेरक असलेल्या नैतिक भावनेला ओहटी लागली आहे, हेंहि आपणास दिसूं लागेल. मोठे द्वेष व मोठ्या आशा यांचा परिणाम ज्यांच्या वर कमी होतो अशी एक नवी पिढी सुखसोयींकडे आकृष्ट होणें शक्य होईल. धर्मोन्मादापासून मुक्त होण्याकरितां सुखाळूपणाची अपेक्षा आपण करावी ही गोष्ट करुणास्पद असेल; परंतु इंद्रियभोगाधीन माणूस आपल्याबरोबर माणसांवर प्रेम करूं शकतो; आणि धर्मोन्मत्ताला त्यांचा द्वेषच करावा लागतो. बौद्धिक बंडखोरी उद्भवण्याचीहि आपणांस आशा वाटूं लागते. ज्या राज्याच्या रूक्ष क्षुल्लक गोष्टींचा धडधडीत असत्याचा पाठपुरावा माणसाच्या श्रेष्ठ विवेचक बुद्धीच्या प्रयत्नांनीं चालतो; त्यांचा जो तर्कसिद्ध परिणाम घडतो त्याच्याविरुद्ध अखेरीस माणसाच्या विवेचक शक्तींचें बंड चिथविलें जाणें शक्य आहे. एकदां अस्पष्ट व अप्रामाणिक म्हणून ज्यांची निंदा झाली ते ध्येयवादी वा भाववादी ( Idealistic ) भाषाप्रयोग, त्यांचा अर्थ पुनः सांपडला अशा जाणिवेनें, माणसांच्या ओठावर पुनः येऊं लागतील. स्वातंत्र्यानें स्वतःचा घात करून घेऊन जी पडझड झाली त्यांतच पुनः स्वातंत्र्याचा शोध लागेल. आणि स्वातंत्र्याच्या या मौलिक मागणीच्या आधारावर खऱ्या श्रद्धांचें संपूर्ण विश्व पुनः उभारलें जाईल.

भविष्यकाळांत आपण कसलीहि प्रगति केली तरी २० व्या शतकांतील क्रांत्यांच्यामुळें या युगांतील वैचारिक अस्थिरता उघडकीस येईल; यानंतरच्या कोणत्याहि घटना ही गोष्ट खोटी ठरवूं शकणार नाहींत. ही अस्थिरता प्रत्यक्ष आचरणांत आणून अनुभविल्याशिवाय तिची चिकित्साहि आपण करूं शकत नाहीं. स्वतंत्र समाजांत विज्ञान, कला व नीति यांची स्वतंत्ररीत्या वाढ होण्यास मिळणारी मान्यता हें दर्शित करते कीं, त्याकरितां अधिकारसंपन्न तज्ज्ञांच्या विशिष्ट संघानें प्रदान केलेली व वाढविलेली विशिष्ट वैचारिक परंपरा परिपुष्ट व्हावी म्हणून समाजानें वाहून घेतलें आहे; हा विशिष्ट संघ








नवीन नवीन भरतीनें चालू ठेवावा लागतो. अशा समाजानें वैचारिक स्वातंत्र्य राखून ठेवावें म्हणून एक प्रकारच्या श्रद्धामय प्रवृत्तीस उत्तेजन द्यावें लागतें; या श्रद्धामय प्रवृत्तींत मात्र विशिष्ट श्रद्धेय तत्त्वें नसतात; स्वतंत्र समाजाच्या विशिष्ट सांस्कृतिक नेतृत्वानें नावीन्याच्या प्रक्रियेवर लादलेल्या मर्यादांच्या योगानें हें वैचारिक स्वातंत्र्य अबाधित राहतें. परंतु ही श्रद्धामय प्रवृत्ति व आदरणीय सांस्कृतिक अधिकारसंपन्न व्यक्ति यांना राज्याच्या दमनशक्तीचा पाठिंबा लागतो, आणि संपत्तिशाली मंडळींचा पैसा लागतो. त्यांच्या अधिकाराची ज्या संस्थांच्या योगानें अंमलबजावणी होते त्या पाठशाला, विद्यापीठें, धर्ममठ, अकादम्या, न्यायालयें, वृत्तपत्रें आणि राजकीय पक्ष ह्या संस्था त्याच पोलिस शिपायांच्या व सैनिकांच्या नियंत्रणांत असतात कीं, जे जमीनदारांच्या पुंजीशाहीच्या संपत्तीचें रक्षण करतात. स्वतंत्र समाजाचें निवासस्थान म्हणून ही अशी संस्थांची रचना मान्य केली पाहिजे काय ? न्याय व बंधुता यांच्या स्थापनेकरितां आवश्यक अशा मौलिक प्रयत्नापासून दूर राहूनच राजकीय स्वातंत्र्य नैतिक स्वयंनिर्णयाच्या ज्या संपूर्ण हक्कावर आधारलेलें असतें तो संपूर्ण हक्क सुरक्षित राहील हें खरें आहे काय ? सध्यां अस्तित्वांत असलेल्या विषमतांच्या बंधनांना शिथिल करणें, पार तोडणें नव्हे, यापेक्षां आपल्या हयातींत अधिक कांही करूं नये, असें जर मानलें नाहीं तर, लोकांना गर्हणीय गुलामगिरींत लोटणें आपणांस भाग पडणार काय ?

माझ्या दृष्टीनें मी म्हणेन कीं, होय. माझी खात्री आहे कीं, ह्या मर्यादा पाळणें पूर्ण आवश्यक आहे. अन्याय्य विशेषाधिकार सावधपणें पायरी पायरीनेंच कमी करीत गेले पाहिजेत; जे त्यांचा नाश एका रात्रींत करतील ते त्याऐवजीं त्या ठिकाणीं अधिक मोठ्या अन्यायाची उभारणी करतील. सर्वव्यापी राजकीय सत्तेलाच समाजाचें सर्वव्यापी नैतिक नवीनीकरण करतां येणें शक्य आहे परंतु त्यामुळें मानवी नैतिक जीवनाचा अनिवार्यपणें नाशच होईल. *

---

## पुस्तक-परामर्श

**Dialogues with the Guru** – by R. Krishnaswami Aiyar, published by Chetana Ltd. 34, Rampart Road, Bombay 1. pages 182+i–xii. price Rs 5–

प्रस्तुत ' गुरु शिष्यसंवादां'तील गुरु शृंगेरीमठाचे माजी शंकराचार्य श्री चन्द्रशेखरभारतीस्वामी हे आहेत. ते १९१२ सालीं शृंगेरीपीठावर अधिष्ठित झाले त्यांनीं १९५४ सालीं जलसमाधि घेतली. त्यांच्या ज्या अनेक विषयांवर आपल्या शिष्यांशीं चर्चा झाल्या त्या संवादरूपानें प्रस्तुत पुस्तकांत संग्रहीत केल्या आहेत. हे संवाद हिंदुधर्म, धर्मप्रचार, भक्ति, अद्वैत, ईश्वर, नियति आणि व्यक्तीचें आचारस्वातंत्र्य इत्यादि धार्मिक व तात्त्विक विषयांपासून तों आधुनिक शिक्षण, वकीलीचा धंदा, विवाह-सुधारणा इत्यादि विषयांवर असून त्यासंबंधी या गुरूंचीं मतें येथें निःसंदिग्धपणें प्रकट झालीं आहेत.

श्री चन्द्रशेखर भारतीस्वामी हे स्वतः वेदान्त, तर्कशास्त्रांत व्युत्पन्न पंडित असून, साक्षात्कारी पुरुष होते. प्रस्तुत पुस्तकांत त्यांचे जे विचार प्रकट झाले आहेत ते पहातां, त्यांच्या विचारांची चौकट एक विशिष्ट, ठराविक दिसून येते. प्राचीन कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म, मोक्ष, ईश्वर, शास्त्रप्रामाण्य इत्यादि बाबतींत त्यांची निष्ठा परंपरागत सनातनी विचारवंताची असून, त्याच भूमिकेवरून त्यांनीं आपले विचार प्रकट केले आहेत. ही चौकट व ही भूमिका ज्यांना ग्राह्य, श्रद्धेय व मान्य असेल, त्यांना त्यांचे विचार त्या चौकटीपुरते स्वच्छ, तर्कशुद्ध व संशयच्छेदी वाटतील यांत शंका नाहीं. जिज्ञासु शिष्यांना अनेकप्रकारें छेडून, अनेक युक्तिवाद व उदाहरणें यांच्या साहाय्यानें आपली ठाम श्रद्धा व भूमिका शिष्यांच्या गळीं उतरविण्याचें स्वामींच्या ठिकाणीं असलेलें सामर्थ्य या संवादांतून चांगलें प्रतीत होतें. एक नमुना म्हणून ( Fate and Free Will ) ' नियति व इच्छास्वातंत्र्य '

---

* प्रा. मायकेल पोलॅनी, मँचेस्टर विश्वविद्यालयांतील समाजशास्त्राचे प्राध्यापक, यांनी The Magic of Maxism हा निबंध ' Committee on Science and Freedom ' या संघटनेच्या वतीनें स्वतंत्र पुस्तिकेच्या रूपानें प्रसिद्ध केला. त्याचा हा शब्दशः अनुवाद आहे.








या विषयावरील स्वामींचे विचार देण्यासारखे आहेत : " दैव किंवा नियति हें पूर्व कर्माचें संचित होय. या उलट, इच्छास्वातंत्र्याचें कार्यक्षेत्र वर्तमानकालांत आहे. भूतकाल व वर्तमानकाल यांची ही कुस्ती आहे. यांत कोण जिंकील हें परस्परांच्या बलाबलावर अवलंबून राहील – एका खांबांत खिळा ठोकलेला आहे. तो उपटून काढायची इच्छा उत्पन्न झाली तरी ती यशस्वी होणें अनेक गोष्टींवर अवलंबून आहे. त्याकरितां तो खिळा खांबांत किती खोल गेलेला आहे, बाहेर जेवढा खिळ्याचा भाग दिसतो त्यापेक्षां किती प्रमाणांत कमी-जास्तपणें तो खांबांत 'अदृष्ट' आहे, लांकूड कशाप्रकारचें आहे, ओढून काढूं इच्छिणाऱ्याची ताकद व साधनसामग्री किती आहे इत्यादि गोष्टी लक्षांत घेणें आवश्यक ठरतें. हें सर्व ओळखून यशापयश स्वीकारणें हें शहाणपणाचें होय. "

स्वामी आधुनिक शिक्षणाविरुद्ध आहेत. प्राचीन चातुर्वर्ण्यव्यवस्था अमलांत यावी असें त्यांस वाटतें. विधवाविवाहाच्या बाबतींत स्वामींचे विचार मनोरंजक वाटण्यासारखे आहेत. स्वामींच्या मतें, विधवाविवाहाला उत्तेजन देऊन ते घडवून आणणें म्हणजे अविवाहित कन्यांची संख्या वाढवून समाजापुढें आणखी एक नवीन प्रश्न निर्माण करणें होय.

प्रस्तुत 'गुरुशिष्यसंवादा'ला पॅरिस विश्वविद्यालयाच्या एका अध्ययनशाखेचे संचालक प्रोफेसर पॉल मासॉँऔरसेल यांनीं प्रस्तावनेदाखल दोन शब्द लिहिले आहेत. त्यांत त्यांनीं " प्रस्तुत गुरुशिष्यसंवादांतल्यासारख्या विचारांनींच भारतीय संस्कृतीचा उद्धार होईल " अशी आशा प्रकट केली आहे (" It is dissemination of this kind of knowledge alone that can prevent its civilization, with its. So rich past and so rich future, from foundering in a chastic humanism " ). पाश्चात्य विद्वानाची ही भलावण वाचून बुद्धिवादी विचारवंताला मोठी मौज वाटेल. प्रस्तुत 'गुरुशिष्यसंवादा' मागें जी विचारांची चौकट, जीं श्रद्धास्थानें गृहीत धरलीं आहेत तींच आजच्या वैज्ञानिक दृष्टिकोनापुढें ढांसळून पडत आहेत. अशा स्थितींत प्रस्तुत पुस्तकाचें आकर्षण एक विशिष्ट श्रद्धा बाळगणाऱ्या वाचकांनाच वाटूं शकेल हें उघड आहे.

— वि. म. वेडेकर

---

**मोहर** — साहित्यसहकार प्रकाशन, फर्ग्युसन् महाविद्यालय, पुणें ४. ( १९५७ ) पानें ४०

फर्ग्युसन महाविद्यालयांतील 'साहित्यसहकार' तर्फे प्रकाशित झालेला महाविद्यालयीन उदयोन्मुख कवीच्या कांहीं कवितांचा हा संग्रह आहे. 'नव' काव्याचे प्रवर्तक कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या स्मृतीस आदरांजलि म्हणून हा संग्रह अर्पण केला आहे. संग्रहांत एकंदर ३० कविता आहेत.

उदयोन्मुख कविकवयित्रींच्या प्रतिभेवरील मोहरून आलेल्या मंजरींचा हा गुच्छ आपल्या अनेकविध रंगच्छटांनीं शोभिवंत दिसतो, यांत शंका नाहीं. त्यांतील मंजरी जरी विशेष रसरशीत व सौरभयुक्त वाटत नसल्या तरी त्यांतून वसंतागमनसूचक कांहीं नवीन चैतन्य सळसळत असल्याचें प्रत्ययास येतें.

या संग्रहांतील 'कवि मर्ढेकर' या कवितेंत कवि श्री. रतनलाल भंडारी म्हणतात :

" द्रोणमूर्ति तव कविता झाली
एकलव्य ते सारे आम्ही;
तुझ्या स्मृतीला वंदन करुनी
पुनश्च घुमवूं तुझीच वाणी. "

या उदयोन्मुख कवींना एकलव्याची प्रतिभा, निष्ठा, व्यासंगशीलता आणि अक्षत यश लाभो अशीच शुभेच्छा या संग्रहाचा रसिक वाचक प्रकट करील.

— वि. म. वेडेकर

---

**पोंच—**

**अवलिया** ( नाटक ) सौ. मुक्ताबाई दीक्षित, प्रका. वि. ना. दीक्षित, इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४.










अनुक्रमणिका

अनुक्रमणिका





